



नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

जैसें बिंब तरी बचकेचि एवढें ।
परी प्रकाशासि त्रिभुवन थोकडें ।
शब्दाची व्याप्ति तेणें पाडें ।
अनुभवावी ॥

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष १२ : अंक १ : हिवाळा १९९४








अनुक्रमणिका

**लेखाचे नाव** **अनुक्रम**




**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्ग्रीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१/२४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातींचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद किंवा साहित्य संस्कृति मंडळ सहमत असतीलच असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

**संपादक :** कल्याण काळे. प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा

**मुद्रणस्थळ :** संगम प्रेस प्रा. लि., कोथरूड, पुणे

**अक्षरजुळणी :** ऋतुजा, सौ. अनुराधा मोहन वेल्हाळ, बिबवेवाडी, पुणे ३७

# स्त्रीवादी लेखन आणि भाषेतील अडसर

आपली समाजव्यवस्था पुरुषप्रधान आहे. कुटुंबात काय किंवा समाजात काय, पुरुषानं स्वतःकडे प्रतिष्ठेच्या भूमिका घेतल्या आणि स्त्रीला या दोन्ही क्षेत्रांत नगण्य दुय्यम स्थान दिलं. अनेक वर्षांच्या संस्कारांतून स्त्रीनं ही दुय्यम भूमिका निमूटपणे स्वीकारली, तिच्या ती अंगवळणी पडली आणि त्याविरुद्ध प्रतिकार करण्याची तिची जाणीवही बधिर झाली. पुरुषवर्गानं लादलेल्या कर्तव्य-विभागणीविरुद्ध तिनं 'ब्र' ही काढणं शक्य नव्हतं. पण आता स्त्री जागृत होऊ लागली आहे. तिला आपल्या स्वत्वाची जाणीव होऊ लागली आहे. ती विचार करू लागली आहे आणि त्यामुळं तिला आपल्या परिस्थितीची बोचणी जाणवू लागली आहे. आता ही परिस्थिती बदलण्यासाठी तिचे प्रयत्न चालू झाले आहेत. पुरुषवर्गाची मिरासदारी ठरलेल्य क्षेत्रांत ती आता प्रवेश करू लागली आहे. त्यांच्या बरोबरीनं मोठमोठ्या जबाबदाऱ्या पेलू लागली आहे.

पण जुन्या सामाजिक संस्था स्थितिशील असल्यामुळं तिच्या या बदलत्या योग्यतेची दखल घ्यायला त्या खळखळ करत आहेत. अशा संस्थांपैकीच भाषा ही एक संस्था आहे. मराठी भाषेचंच उदाहरण घ्यायचं, तर मराठी भाषा प्रामुख्यानं पुरुषप्रधान व्यवस्थेखालीच अद्याप वावरते आहे. सर्व प्रतिष्ठेची स्थानं पुरुषाचीच, अशी आपली समजूत आहे. त्यामुळं वकील, डॉक्टर, इंजीनिअर, न्यायाधीश, कलेक्टर, इ. बद्दल सर्वसामान्य विधान करायचं झालं, तरी आपण त्या व्यक्ती पुरुष आहेत, अशीच समजूत करून विधान करतो. 'कलेक्टर गाडीत जाऊन बसले,' 'न्यायाधीश वकिलांना म्हणाले', 'डॉक्टर आले आणि त्यांनी पेशंटला तपासलं,' 'वकीलसाहेब पुस्तक वाचत होते,' 'अमुक कंपनीचे इंजीनिअर कारखान्याला भेट देऊन गेले' अशी वाक्यं आपण चटकन लिहून/बोलून जातो. आता या सर्व पदांवर स्त्रिया येऊ लागल्या आहेत, मोठ्या संख्येनं येऊ लागल्या आहेत. तरी पण आपल्या भाषिक सवयी आपण अजून बदललेल्या नाहीत. 'न्यायाधीश वकिलांना म्हणाल्या,' 'कलेक्टर दौऱ्यावर गेल्या,' 'वकीलसाहेब आपला मुद्दा मांडत होत्या,' 'डॉक्टर आल्या आणि त्यांनी पेशंटला तपासलं', 'पाच-सहा इंजीनिअर या कामावर देखरेख करत होत्या' अशी वाक्यं आपल्या बोलण्यात सहजासहजी येत नाहीत. प्रत्यक्ष वस्तुस्थितिदर्शक विधान करताना वरील वाक्यांचा उपयोग करण्याचा प्रसंग आला, तरी आपल्याला बुजल्यासारखं होईल.

काही पदं तर खास पुरुषांसाठीच निर्माण झाली आहेत, अशाच समजुतीनं आपण त्यांच्यासाठी संज्ञा बनवलेल्या आहेत. उदा., सेनापती, राष्ट्रपती, उद्योगमहर्षी, राष्ट्रपिता, इ.





अनुक्रमणिका

आता स्त्रिया सुद्धा या पदांवर हक्क दाखवण्याइतकं कर्तृत्व दाखवू लागल्या आहेत. पण हे शब्द त्यांच्या बाबतीत कसे वापरायचे ? कारण हे सर्व पुरुषवाचक शब्द आहेत. एखाद्या स्त्रीचा राष्ट्रपती, राष्ट्रपिता असा उल्लेख विसंगत ठरतो. राष्ट्रपिताऐवजी 'राष्ट्रमाता' असं फार तर म्हणता येईल; पण 'राष्ट्रपिता' या शब्दातील गौरव आणि आदर 'राष्ट्रमाता' शब्दातून व्यक्त होऊ शकेल, की नाही, याबद्दल संशयच आहे.

मराठीत पुरुषवाचक शब्दांपासून स्त्रीवाचक शब्द काही प्रत्ययांच्या साहाय्यानं बनवता येतात. उदा., 'ईण' प्रत्यय लावून फौजदार-फौजदारीण, पाटील-पाटलीण, कलेक्टर-कलेक्टरीण, इ. प्रमाणे शब्द बनवता येतील. पण हे सर्व शब्द पत्नीबोधक आहेत. कर्तृत्वानं या पदांवर काम करणाऱ्या स्त्रीला हे शब्द लावता येणार नाहीत. मास्तरीण, वकिलीण, डॉक्टरीण हे शब्द उभयसूचक आहेत. म्हणजे त्यांनी पत्नीत्वाचाही बोध होतो आणि पदांचाही बोध होऊ शकतो. पण केवळ व्यवसायानं या पदांवर असलेल्या स्त्रीला स्वतःबद्दल हे शब्द वापरलेले रुचणार नाहीत. 'अक' प्रत्ययान्त पदवाचक शब्दांचा 'इका' प्रत्ययान्त शब्दात रूपान्तर करून पदबोधक स्त्रीवाचक शब्द बनवता येतात. उदा., प्राध्यापक-प्राध्यापिका, शिक्षक-शिक्षिका, व्यवस्थापक-व्यवस्थापिका, इ. पण असे शब्द सर्रास बनवता येणार नाहीत. उदा., अभ्यासक-अभ्यासिका. अभ्यासिका म्हणजे अभ्यास करणारी स्त्री असा अर्थ आपल्याला अभिप्रेत आहे; पण मराठीत तो अभ्यासाची खोली या अर्थानं रूढ आहे. मालक-मालिका हे उदाहरण वक्रतुंडी विनोदासाठी ठीक होईल. लेखक-लेखिका हा शब्द ठीक आहे; पण लेखिका शब्द स्त्रीवाचक वाटत नाही म्हणून की काय, 'स्त्री-लेखिका' असा प्रयोग सर्रास केलेला आढळतो. (जाता जाता सांगायचं, तर नर्तक शब्दाचं स्त्रीलिंगी रूप संस्कृतच्या धोरणानं नर्तिका नसून नर्तकी आहे.)

संस्कृतात पत्नीबोधक आणि व्यवसाय-पद-बोधक असे भिन्न प्रत्यय लावून काही शब्द बनवता येतात. उदा., आचार्य पासून 'आचार्या' हा पदबोधक आणि 'आचार्यानी' हा पत्नीबोधक असे शब्द तयार करता येतात; पण मराठीत असे भिन्न प्रत्यय आढळत नाहीत. पण अलीकडे पदवाचक शब्दच उभयलिंगी समजून वापरतात. पत्नीवाचक शब्दासाठी ईण प्रत्ययानं काम होतं. उदा., डॉक्टर (स्त्री, पुरुष), डॉक्टरीण (पत्नी), कलेक्टर (स्त्री, पुरुष), कलेक्टरीण (पत्नी), इ. या शब्दांचं सामान्य रूप होत नसल्यानं हे शब्द उभयलिंगी चालतील. पण फौजदार, वकील, न्यायाधीश, इ. शब्द अडचणीचे ठरतील. कारण फौजदारानं, वकिलानं असे सामान्यरूपयुक्त शब्द बनताच, ते शब्द केवळ पुरुषबोधक ठरतात. स्त्रीला ते लागू होत नाहीत. यासाठी स्त्री-फौजदार, स्त्रीवकील, स्त्रीन्यायाधीश असे जोडशब्द बनवतात आणि स्त्रीफौजदाराचं, स्त्रीन्यायाधीशानं असे शब्दप्रयोग करतात. सामान्य रूप पुल्लिंगी शब्दांचं

असलं, तरी त्याकडे दुर्लक्ष करतात.

काही शब्द 'कार' प्रत्यय लावून बनलेले असतात. उदा., ग्रंथकार, भाषांतरकार, इ. ही कार्यं स्त्रियाही करत असल्या, तरी भाषेचा सर्व रोख पुरुषत्वसूचनाकडे आहे. 'ग्रंथकार म्हणाली.' 'भाषांतरकार दोन्ही भाषांचा अभ्यास करते.' असे प्रयोग आढळत नाहीत. पण हल्ली स्त्रीवादी जाणिवेतून असे प्रयोग येऊ लागले आहेत (पाहा : भाषा आणि जीवन ११:४ दिवाळी, १९९३ मधील गौरी देशपांडे यांचा लेख) पण सामान्यरूपात येथेही अडचण निर्माण होते. तेव्हा स्वतंत्र स्त्रीवाचक शब्द बनवण्याची गरज निर्माण होते. ग्रंथकारिणी, भापांतरकारिणी, हे पर्याय बोजड वाटतात. गंथकर्ती, भाषांतरकर्ती हे शब्द काहीजण वापरतात; पण ते संस्कृत शब्दसिद्धीच्या दृष्टीने चुकीचे आहेत. ते ग्रंथकर्त्री, भाषांतरकर्त्री असे हवेत. पण ते बोजड वाटतील. आपल्याकडे अभिनेता - अभिनेत्री हा एकच शब्द योग्य प्रकारे वापरला जातो. पण बाकी सर्रास ग्रंथकर्ती, उद्गाती, असेच शब्द, वापरले जातात. पुढेमागे ते मान्य होतीलही.

या सगळ्या विवेचनावरून हे लक्षात येतं, की पुरुषवर्चस्व झुगारण्याच्या स्त्रीवादी चळवळीच्या मार्गात अडथळे निर्माण करण्यात भाषेनंही मोठ्या प्रमाणात हातभार लावला आहे. कोणताही नवा विचार फक्त वैचारिक पातळीवरच मांडावा लागतो, असं नसून त्याच्या अभिव्यक्तीला योग्य अशी भाषेची तरतूदही करावी लागते. अभिव्यक्तीच्या गरजेच्या रेट्यामुळं ती होतही जाते. पण संधिकाळात मात्र संदिग्धतेला खूप वाव राहतो. अशी तरतूद आपल्याकडे आलेल्या सर्वच नव्या विचारांना करावी लागली आहे. समाजव्यवहाराची भाषा मुळातच स्थितिस्थापक असते. रूढ संकेतांभोवती तिनं शब्द आणि व्याकरणाची संरक्षक तटबंदी उभी केलेली असते. नव्या विचाराला अगोदर या तटबंदीला खिंडार पाडूनच आत प्रवेश मिळवावा लागतो. ही तटबंदी मात्र, वाटते, तेवढी अभेद्य नसते, हा या बाबतीतला आश्वासक भाग आहे.

**कल्याण काळे**

***

# जेजुरीचा जर्मन वारकरी : डॉ. गुन्थर सोन्थायमर

शं. गो. तुळपुळे

डॉ. गुन्थर सोन्थायमर यांना मी प्रथम १९७४ मध्ये एका चहापान-समारंभात पाहिले. त्या वेळी पॅरिस विद्यापीठातील प्रसिद्ध इंडॉलॉजिस्ट डॉ. शार्लोत वोदविल यांनी त्यांच्या पुण्याच्या राहत्या बंगल्यात काही मित्रमंडळींना चहापानास बोलाविले होते. डॉ. वोदविल माझ्याबरोबर नामदेव-तुकारामांचे अभंग वाचीत असत, त्यामुळे त्यांचा-माझा स्नेह जुळून आला होता. त्या सायंकाळच्या चहापानास त्यांनी पाचपन्नास मंडळींना बोलावलेले होते, त्यांत काही पाश्चात्य अभ्यासकही होते. त्यांपैकी डॉ. सोन्थायमरशी त्यांनी माझी ओळख करून दिली. पण ती ओळख अगदीच ओझरती आणि औपचारिक होती. मी ती विसरूनही गेलो होतो. त्यामुळे त्यानंतर सुमारे वर्षभराने डॉ. सोन्थायमर मला भेटले, तेव्हा मी त्यांना ओळखलेही नाही.

पण ती भेट फार महत्त्वाची ठरली. त्या एका भेटीत आम्हा दोघांमधील भावी स्नेहसंबंधाचा पाया घातला गेला. त्याचे असे झाले, की एक दिवस मला त्यांचे दिल्लीहून पत्र आले. त्या वेळी ते जर्मनीतील हाइडलबर्ग विद्यापीठाच्या 'साउथ एशिया इन्स्टिट्यूट'च्या दिल्ली येथील शाखेचे प्रमुख म्हणून काम पाहत होते. त्या पत्रात त्यांनी डॉ. वोदविल यांनी करून दिलेल्या ओळखीची आठवण देऊन मला त्यांच्याबरोबर 'लीळाचरित्रा'चा काही भाग वाचणे जमेल काय, अशी विचारणा केली होती. त्यांची कल्पना रोज एक तास, याप्रमाणे ओळीने दहा दिवस वाचन करावयाचे. त्यासाठी, मी म्हणेन, ते सन्मानवेतन ही (honorarium) त्यांनी देऊ केले होते. मी ते साभार नाकारून त्यांनी 'लीळाचरित्र' वाचण्यासाठी केव्हाही यावे, असे त्यांना कळविले. त्याप्रमाणे पूर्वसूचना देऊन एका दिवशी सकाळी दहाच्या सुमारास माझ्या गावातील घरी आले. थोडे औपचारिक बोलणे होऊन त्यांनी 'लीळाचरित्रा'ची आपली प्रत काढली आणि आम्ही वाचनाचा श्रीगणेशा केला. चक्रधरांच्या या 'लीळाचरित्रा'चा आरंभ मोठा विचित्र आणि वाचकास गोंधळात टाकणारा आहे. तो असा आहे :

'माहादाइसीं प्रष्णु केला : "जी जी : या मार्गासि कवण आदि ?' यावरि सर्वज्ञें म्हणीतलें: "बाइ : या मार्गासि श्रीदत्तात्रय प्रभु आदि :" सर्वज्ञें म्हणीतलें : 'बाइ : दत्तात्रयप्रभु गोसावीं भोगभूमी कृतयोगीं रीखीस्वराचां ठाइं अवतारु स्वीकरिला : अत्रि रीखि पिता : अनुसैया माता : मग त्रेतीं कर्मभूमीसि सैहाद्र पर्वतासि बीजें केलें : ' गोसावीयांसि जीव उधरावेयाची प्रवृति : मग गोसावीयांसि तेथ अवस्थान जालें : मग राज्य करूं लागले : ॥ (कोलते प्रत, पूर्वार्ध क्र. १)

वरील उताऱ्यातील जुनी मराठी भाषा सोडून दिली, (तरी 'बीजें केलें' आणि 'राज्य करूं लागले' या वाक्यांवर नवीन अभ्यासक ठेचकाळतोच !) तरी माहादइसा, सर्वज्ञ, गोसावी ही मंडळी कोण आणि त्यांचा येथे संबंध काय, हे प्रश्न उभे राहतातच. मराठी मातृभाषा असणाऱ्या वाचकाला सुद्धा ही लीळा हतबुद्ध करील. डॉ. सोन्थायमर तर जर्मन. त्यांना त्या वेळी मराठी थोडेफार समजत असले, तरी या पहिल्या लीळेनेच त्यांची विकेट घेतली, यात नवल नाही. लीळा वाचून झाल्यावर त्यांनी मान वर करून माझ्याकडे पाहिले आणि चेहऱ्यावर शून्यत्वाचा भाव दाखवून ते मला म्हणाले, 'I am totally blank!'

मग मला त्यांना या चरित्राची पार्श्वभूमी सांगावी लागली. महानुभावांचे पंचकृष्ण कोण, त्यांचा दत्तात्रेय पौराणिक दत्तात्रेयाहून कसा भिन्न आहे, कर्मभूमी म्हणजे काय, राज्य करणे म्हणजे 'to rule' नव्हे, तर आनंदात राहणे, इत्यादी खुलासे करावे लागले.

त्यानंतरची दुसरी लीळा पंचकृष्णांपैकी द्वारावतीच्या चांगदेव राउळांविषयी असून ती त्यांना फार आवडली. ती वाचताना त्यांना 'लीळाचरित्रा'चा हा भाग Flash-back पद्धतीने रचिलेला असल्याची जाणीव होऊन, या ग्रंथराजाने त्यांच्या मनाची चांगलीच पकड घेतली.

या पहिल्या दोन लीळांची दोन पाने वाचायला आम्हांला दोन-अडीच तास लागले. काम संपवून उठलो, तेव्हा दुपारचा एक वाजला होता. वेळ जेवायची होती, म्हणून मी त्यांना जेवून जाण्याचा आग्रह केला, तेव्हा त्यांच्यांतील 'जर्मन' जागा होऊन लगेच म्हणाला,

'पण मी तुम्हांला तशी पूर्वसूचना दिलेली नाही. तुमच्या घरातील लोकांना त्रास होईल.'

त्यावर मी त्यांनी संकोच करू नये, भारतीय आतिथ्याची परंपराच तशी आहे, असे पुष्कळ सांगितल्यावर ते आमच्याबरोबर जेवायला तयार झाले. जेवतानाही त्यांच्या भिडस्त आणि संकोची वृत्तीची पुन्हा जाणीव झाली. आणखी एक गोष्ट कळली, की त्यांना हिरव्या मिरचीचा ठेचा फार आवडतो.

पुढे अधिक परिचय झाल्यावर आम्ही त्याला 'सोन्थायमर डिश' म्हणत असू.

ते दहा दिवसांसाठी म्हणून आले, पण तीन-चार दिवसच राहिले. तेवढ्या अवधीतही त्यांनी 'लीळाचरित्रा'चा सर्वसाधारण अंदाज घेतला आणि त्या संपूर्ण ग्रंथाचा इंग्रजीत अनुवाद करण्याची कल्पना त्यांच्या मनात रुजली.

पुढल्या वर्षी ते जर्मनीहून पुण्याला आले, ते हा विचार पक्का करूनच आले. वास्तविक त्यांच्या अभ्यासाचा विषय निराळा होता. ते मूळचे जर्मन. पण लंडन विद्यापीठातील प्रो. डेरेट आणि पुण्याचे डॉ. कोसंबी यांच्या तालमीत तयार झालेले हाडाचे संशोधक. त्यांच्या अभ्यासाचा आणि संशोधनाचा विषय लोकधर्म, किंवा Folk Religion. त्यासाठी प्रत्यक्ष



डॉ. गुन्थर सोन्थायमर

पाहणी (Field Work) कशी करावी, याचे धडे त्यांनी डॉ. कोसंबींकडून घेतलेले होते, आणि त्या वेळी ते जेजुरीच्या खंडोबा संप्रदायाचा अभ्यास करीत होते. 'लीळाचरित्रा'चा त्या अभ्यासाशी तसा संबंध नव्हता; पण त्या ग्रंथात लौकिक धर्म व त्याचे आचार यांचे प्रतिबिंब इतक्या ठिकाणी उमटले आहे, की त्यामुळे 'लीवाचरित्रा'ला त्यांच्या अभ्यासाच्या क्षेत्रात महत्त्वाचे स्थान मिळाले. ग्रंथ फार मोठा, सुमारे आठशे पृष्टांचा. त्यात पुन्हा भाषा जुनी आणि लौकिक, मागचे-पुढचे संदर्भ फार; गावांच्या आणि माणसांच्या नावांची विपुलता; आणि मुख्य म्हणजे, स्वतः चक्रधरांचे गूढरम्य जीवन. पण या सर्व अडचणींवर मात करणारा एक मोठा गुण डॉ. सोन्थायमर यांच्या ठिकाणी होता. तो म्हणजे धीरता, Patience. त्यांना घाई कशाचीच नसे. मरणाचीच तेवढी कशी झाली, ते कळत नाही.

डॉ. सोन्थायमर प्रतिवर्षी निदान दोनदा तरी भारतात येत. हाइडलबर्ग विद्यापीठात ते धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्या इतिहासाचे प्राध्यापक होते; त्याशिवाय प्राथमिक मराठी भाषाही शिकवीत. तिकडे एक उन्हाळी आणि दुसरे हिवाळी अशी दोन सत्रे असतात. एक सत्र संपले, की त्याच दिवशी पुण्याला यायला निघत आणि मग दुसरे सत्र सुरू होईपर्यंत पुण्यात राहत. म्हणजे त्यांचा मुक्काम सहा महिने जर्मनीत आणि सहा महिने भारतात असे. ते वारंवार इकडे येतात, म्हणून त्यांच्याविषयी जर्मनीत He is sometimes seen in Heidelberg असे विनोदाने म्हटले जाई. त्यांना भारताची आणि त्यातून पुण्याची विलक्षण ओढ असे. एका पत्रात ते लिहितात, 'मला इथे (हायडलबर्गमध्ये) फार कष्ट आहे, आज महाराष्ट्राहून लांब





अनुक्रमणिका

वाटत आहे. म्हणून विचार करीत आहे, की इथे सप्टेंबरपर्यंतत राहायला सहन करू शकणार, की नाही ?' (ता. १-६-१९८७) कुणाचा विश्वास बसणार नाही, पण सोन्थायमर प्रथम पुण्याला आले, ते लॉ कॉलेजात विद्यार्थी म्हणून आले. हिंदू धर्मशास्त्राचा अभ्यास करण्यासाठी. त्याच वेळी त्यांची योगायोगाने डॉ. कोसंबी यांच्याशी ओळख झाली आणि त्या ओळखीची परिणती स्नेहात झाली. इतकेच नव्हे, तर डॉ. कोसंबी त्यांचे स्फूर्तिस्थान झाले. ते जेजुरीच्या खंडोबाकडे वळले, तेही डॉ. कोसंबींच्या प्रेरणेनेच. भक्तिमार्गी असते, तर पंढरीकडे वळले असते. पण ते बहुधा अज्ञेयवादी असावे. जेजुरीच्या खंडोबाकडे वळले, ते त्याच्या भक्तीने नव्हे, तर प्रेमाने. एका शब्दात सांगायचे म्हणजे, खंडोबा त्यांना आवडला. आणि केवळ खंडोबाच नाही, तर त्याचा सर्व परिवार - त्याची म्हाळसा, त्याची बाणाई, त्याचा गड, त्याचे वाघ्ये आणि मुरळ्या, त्याची गाणी, त्याच्या ओव्या, त्याचे सर्व काही. ते खंडोबाचे भक्त नव्हते, प्रेमी होते. आणि या प्रेमापोटीच त्यांनी फकिरी बाणा स्वीकारला होता.

स्वतः अविवाहित असल्यामुळे पाश असा कोणताही नव्हता. कुटुंबी नव्हते, पण विश्वकुटुंबी मात्र होते. त्यामुळेच त्यांच्या अभ्यासाचे क्षेत्रही हळूहळू वाढत गेले आणि डॉ. सोन्थायमर म्हणजे लोकदैवतांचे, लोकसंस्कृतीचे अभ्यासक असे समीकरणच होऊन बसले. खंडोबाविषयी त्यांनी विपुल लेखन केले. त्यातील पुष्कळसे शोधनिबंध खूप असून ग्रंथ असा एकच आणि तो म्हणजे 'बिरोबा, म्हस्कोबा डंड खंडोबा' (मूळ जर्मन; त्याचा इंग्रजी अनुवाद - Pastoral Deities of Western India - डॉ. ॲन फेल्डहाउस यांनी केला आहे.)

या खंडोबाच्या लग्नघाईत बिचारे 'लीळाचरित्र' तसेच रेंगाळत मागे राहिले. त्यासाठी पुरेसा वेळ डॉक्टरसाहेबांकडे नव्हता. म्हणून त्यांनी एक योजना तयार केली. पुण्यात वेळ मिळत नाही, म्हणून मी जर्मनीला जाऊन त्यांच्याकडे राहावे आणि त्यांच्या सवडीप्रमाणे 'लीळाचरित्रा'चे वाचन करून एखाद्या विषयावर सबंध सत्रभर त्यांच्या विद्यार्थ्यांपुढे व्याख्याने द्यावी, अशी ती योजना होती. अर्थात ती माझ्या पथ्यावरच पडली आणि त्या योजनेनुसार मी सुमारे दहा वेळा हाइडलबर्गला गेलो आणि त्यांच्या घरी तीन तीन महिने राहिलो. म्हणजे एकूण सुमारे अडीच वर्षे मी त्यांच्या निकट सहवासात होतो. याचा लाभ त्यांना कितपत झाला, कोणास ठाऊक, मला मात्र भरपूर झाला. मुख्य म्हणजे, त्यांचा जीवनक्रम जवळून पाहता आला. जर्मन 'प्रोफेसर' कसा असतो,ते मला प्रत्यक्ष अनुभविता आले. डॉ. सोन्थायमर हाइडलबर्गच्या डोसेनहाइम नावाच्या लहान उपनगरात राहत. हा एकटा माणूस तिमजली घरात राहत असे. तळघरात त्यांची अभ्यासिका होती, मधल्या मजल्यावर दिवाणखाना, पाहुण्यांसाठी खोली आणि स्वयंपाकघर होते आणि तिसऱ्या मजल्यावरच्या

एका खोलीत ते झोपत. तळघरात पुस्तके आणि कागदपत्रे इतस्ततः विखुरलेली असत. इतकी, की आत पाऊल टाकायला जागा नसे. आणि कोणी टाकावे, अशी त्यांची इच्छाही नसे. या खोलीत हा एकांडा शिलेदार रात्री दोन दोन वाजेपर्यंत बसून काम करी. मधूनच वर सैंपाकघरात येऊन एखादा चीजचा तुकडा आणि चहाचा कप घेई. याला अपवाद फक्त फूटबॉलच्या मॅचचा. टी.व्ही.वर फूटबॉलचे आंतरयुरोपीय सामने चालू असले, म्हणजे मात्र खंडोबाचा हा उपासक टी.व्ही.ला चिकटून बसे. तरुणपणी डॉ. सोन्थायमर फूटबॉल उत्कृष्ट खेळत. क्रिकेट मात्र त्यांना मुळीच आवडत नव्हते. तेवढ्यापुरते ते खरे जर्मन होते.

रात्रीची जागरणे बहुतेक दुसऱ्या दिवशीच्या व्याख्यानासाठी असायची. कोणत्याही व्याख्यानाची ते कसून तयारी करीत आणि सबंध व्याख्यान लिहून काढीत. त्यांच्या ठिकाणी वक्तृत्व असे नव्हते, पण विद्वत्व होते, आणि त्याहीपेक्षा प्रतिभा होती, प्रज्ञा होती. त्यामुळे त्यांची व्याख्याने गाजली नाहीत, तरी स्फूर्तिदायक ठरली. साध्या विषयात मोठा आशय शोधण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती आणि त्यामुळेच संशोधन करू इच्छिणारे विद्यार्थी त्यांच्याकडे आकर्षित होत. त्यांची वैचारिक बँकही अनेक प्रकारच्या विषयांनी भरलेली होती. त्यांत खंडोबासंप्रदाय तर होताच; पण त्याबरोबर शेख महंमद, एकनाथी भागवत, ज्ञानेश्वरांची गाथा, वारूळपूजा, भुतेखेते, परीकथा, रामभक्तीचा 'वनवासी'पंथ, गोपजनांचा देव विठ्ठल, राजस्थानातील पुष्करतीर्थ, पंढरीची वारी, सोमवती अमावास्येची महती, वीरगळ आणि सतीशिळा, इत्यादी विविध विषयांत ते विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करीत. तरुण विद्यार्थ्यांत लोकसंस्कृतीच्या अभ्यासाची एक चळवळच त्यांनी उभारली होती, असे म्हणण्यास हरकत नाही. त्यांची दृष्टी व्यापक आणि सर्वसमावेशक होती. कोणत्याही मताचा आग्रह नव्हता. विद्यार्थ्यांपासून शिकण्याचीही त्यांची तयारी होती. दुपारचे जेवण विद्यार्थ्यांच्या बरोबर इन्स्टिट्यूटच्या मेन्सामध्ये घेत, तेव्हा सर्वांशी खेळीमेळीने वागणारे, मधूनच चिमटे काढणारे आणि नर्मविनोद करणारे सोन्थायमर दिसून येत. पण कुठे थांबावे, ते त्यांना बरोबर ठाऊक होते, म्हणून वेळ झाली, की "बस ! Enough is enough" असे म्हणून ते चालू लागत. मग घरी परत येताना बाजारहाट. स्वभाव विसरभोळा; त्यामुळे कोठे काय विसरतील, त्याचा नेम नाही. त्यामुळे घरातून बाहेर पडताना मला त्यांना किल्ल्यांची आठवण करून द्यावी लागे. त्यांचा हा स्वभाव ठाऊक असल्याने त्यांची चिटणीस बाई, फ्राउ वेर्नी, त्यांच्या किल्ल्यांचा एक जोड स्वतःपाशी ठेवीत असे. त्याचा उपयोग होण्याचे प्रसंग माझ्या आठवणीत दोनदा तरी आले.

ते जन्माने जर्मन असले, तरी जर्मन लोकांच्या वागण्यातील काटेकोरपणा, हिशेबीपणा, ताठरपणाकडे झुकणारी तटस्थ वृत्ती, यांत्रिक शिस्त, परखडपणा वगैरे गुणदोष त्यांच्या

ठिकाणी अजिबात नव्हते. त्यामुळे एकदा त्यांचे फार मोठे नुकसानही झाले. तो प्रसंग असा:

पुण्याच्या मुक्कामात ते माझ्याबरोबर 'लीळाचरित्रा'तील जो भाग वाचीत, त्याचे ते टेपरेकॉर्डरवर संपूर्ण ध्वनिमुद्रण करून ठेवीत. अशा शे-दीडशे टेप्स त्यांच्या संग्रहात असतील. त्यांतील पुष्कळशा टेप्सचे त्यांनी लिपिकरणही करून ठेवले होते; पण त्याची झेरॉक्स प्रत तयार केलेली नव्हती. एका खेपेस ते जर्मनीला परत जाताना त्यांचे सामान विमानात हरवले आणि खूप शोध करूनही ते परत मिळाले नाही. त्यात पुष्कळशा टेप्स आणि त्यांच्या लिपिकरणाच्या फाइल्स होत्या. त्यांना ते कायमचे मुकले. त्यामुळे तो संपूर्ण भाग, सुमारे शे-दीडशे लीळा, आम्हांला पुन्हा वाचाव्या लागल्या. पण त्यांनी त्याबद्दल इतकी-सुद्धा कुरकुर केली नाही. त्यांच्या ठिकाणी उपजतच एक प्रकारची स्थितप्रज्ञता होती. मी त्यांना गमतीने म्हणत असे, 'तुमचे नाव सोन्तहायमर नाही, 'संत हायमर' आहे.

खंडोबा आणि खंडोबासंप्रदाय यांच्याइतकेच प्रेम त्यांचे मराठी भाषेवर आणि महाराष्ट्रावर होते. जर्मन विद्यापीठात मराठी भाषेचा शिरकाव त्यांच्यामुळे झाला. त्यांच्या हाताखाली पाचपन्नास विद्यार्थी तरी मराठी शिकले. ते मराठी अर्थातच जर्मन भाषेतून शिकवीत. पण त्यांचा पाठ ऐकण्यासारखा असे. त्यासाठी त्यांनी प्राथमिक धडे स्वतः तयार केले होते. मराठी भाषेवरील या प्रेमामुळेच त्यांनी व्यंकटेश माडगूळकरांचे 'बनगरवाडी' आणि केशव मेश्राम यांचे 'जटायू' या कथांचे जर्मनमध्ये अनुवाद केले. पैकी पहिला Das Dorf heiss Bangarvadi म्हणून प्रसिद्ध झाला असून, दुसरा अजून अप्रकाशित आहे. याशिवाय त्यांनी व्यंकटेश माडगूळकरांचा 'वारी' दुर्गा भागवतांचा 'पंढरीचा विठोबा' या निबंधांचे अनुवादही South Asia Digest of Regional Writing मधून प्रसिद्ध केले. दुर्मीळ मराठी ग्रंथांचा संग्रह करण्याची त्यांना हौस होती. त्यामुळे त्यांच्या स्वतःच्या ग्रंथसंग्रहात 'ज्ञानेश्वरी'ची पहिली मुद्रित प्रत, महानुभावांच्या 'साती ग्रंथां'चे सांकेतिक लिपीतील हस्तलिखित, तुकारामांची जुन्यांत जुनी गाथा, इत्यादी दुर्मीळ साहित्य उपलब्ध आहे. ते पुण्याहून गोंधळेकर, ढमढेरे, पारखीशास्त्री, इ.कडून दुर्मीळ मराठी ग्रंथ, ते सांगतील, ती किंमत देऊन खरेदी करीत. दिल्ली विद्यापीठातील डॉ. म. अ. करंदीकर यांचा अमोल ग्रंथसंग्रह त्यांच्यामुळेच आज हाइडलबर्गच्या विद्यापीठात सुरक्षित आहे. आंतरराष्ट्रीय महाराष्ट्र परिषदेची कल्पना त्यांचीच. ती अशा चार-पाच परिषदा भरवून त्यांनी साकार केली. डॉ. सोन्थायमर मराठी भाषा उत्तम प्रकारे जाणत. त्यांची मला असलेली बहुतेक सर्व पत्रे सुंदर, स्वच्छ अक्षरात मराठी भाषेत लिहिलेली आहेत. पुण्याचा मुक्काम संपवून जर्मनीला परत जाताना 'आता आषाढात येईन' किंवा 'माघा'त येईन, असे म्हणत. हायडलबर्गमध्ये असताना त्यांनी मला एकदा सहज विचारले,





अनुक्रमणिका

'तुम्हांला कोणती भाषा जास्त आवडते ? मराठी, की संस्कृत ?'

त्यावर मी 'संस्कृत' असे म्हटल्याबरोबर ते म्हणाले,

'मग तुमचे आमचे जमणार नाही.'

अर्थात तो केवळ विनोद होता. संस्कृतही त्यांना तितकेच प्रिय होते; पण अभ्यास नव्हता. ते मराठी बोलत, ते मात्र थोडे अडखळत. फलटणची मॅक्सिन बर्नसन, किंवा मॉस्कोची इरिना ग्लुश्कोवा, किंवा अमेरिकेचा फिलिप एंग्ब्लोम, किंवा ॲरिझोनाची ॲन फेल्डहाऊस यांच्या बोलण्यातील सहजता किंवा सफाई त्यांच्यांत नव्हती. ते म्हणत, 'मी गावरान मराठी बोलतो.'

-आणि धनगरांच्या सहवासात राहून त्यांनी खरोखरच त्यांची गावरान मराठी आत्मसात केली होती. इतकी, की हातातून एखादी वस्तू पडली किंवा ऐन वेळी सापडली नाही, तर त्यांच्या तोंडून चटकन् 'च्यायला' हा उद्गार सहजपणे बाहेर पडायचा ! पण तो खाजगी बैठकीत, चार लोकांत नव्हे. त्यांच्या अभ्यासाचा आणि संशोधनाचा मुख्य विषय लोकधर्म (Folk Religion) हा असल्यामुळे त्यांना खेड्यापाड्यांतून पुष्कळ भ्रमंती करावी लागे. महाराष्ट्र आणि कर्नाटक ही त्यांच्या अभ्यासाची मुख्य क्षेत्रे होती. त्याशिवाय त्यांची बस्तारलाही एक खेप असे. शोधनिबंध आणि ग्रंथरचना यांबरोबर त्यांनी जर्मन तंत्रज्ञ डॉ. स्टेगम्युलर यांच्या सहकार्याने काही चित्रपटही तयार केले. त्यांपैकी 'खंडोबा' आणि 'वारी' हे दोन विशेष गाजले. ही सर्व कामे करताना त्यांचा भारतीय समाजाच्या सर्व थरांशी संबंध येई. यामुळेच ते 'जगमित्र' झाले. माझ्या सदाशिव पेठेतील घरी 'लीळाचरित्र' वाचायला येत, तेव्हा परत जाताना शेजारचा वाजंत्री आणि वाणी यांच्याशी न विसरता दोन शब्द बोलून जात. धनगर समाजातील अनेकजण त्यांचे मित्र झाले होते. त्यांपैकी रामदास आटकर आणि राजाराम झगडे हे तर डावे-उजवे हातच होते, म्हटल्यास चालेल. धनगरांच्या या ऋणाची अंशतः परतफेड म्हणून त्यांनी एका धनगराला शिखर शिंगणापूर येथे स्वतःच्या खर्चाने एक घर बांधून दिले होते. पण इतके खंडोबामय होऊनसुद्धा ते कशात गुंतले नाहीत. भारतात येणाऱ्या आपल्या जर्मन विद्यार्थ्यांनाही ते सांगत, की लोकांत मिसळा, पण कुठे गुंतू नका (No involvement!)

पूर्वजन्मीचा काही ऋणानुबंध म्हणूनच माझी डॉ. सोन्थायमरांशी ओळख झाली आणि माझ्याशी ते धाकट्या भावाप्रमाणे वागू लागले. माझ्या हायडलबर्गच्या मुक्कामात ते माझी त्याच नात्याने काळजी घेत. मी शाकाहारी असल्याने संध्याकाळचे जेवण स्वतः तयार करीत. त्यात भात, दोन भाज्या, पापड, लोणचे, कोशिंबीर सर्व काही असे. त्यांच्या हाताला एक स्त्री होती. द्राक्षरसाची दीक्षा मला त्यांनीच दिली. युरोपमधील निरनिराळ्या विद्यापीठांशी आणि तेथील विद्वज्जनांशी माझा संबंध त्यांनीच घडवून आणला. माझी दोन इंग्रजी पुस्तके जर्मनीत

प्रकाशित झाली, त्याचे श्रेयही त्यांनाच आहे.

डॉ. सोन्थायमर यांची स्मृती जतन करण्यासाठी त्यांच्या मित्रांनी 'सोन्थायमर कल्चरल असोसिएशन' ही संस्था स्थापन केली असून, डॉ. ॲन फेल्डहाउस आणि डॉ. अजय दांडेकर यांच्या पुढाकाराने ती हळूहळू साकार होत आहे. त्यांना प्रिय असलेल्या जेजुरीत त्यांच्या नावाने Folk Art Museum (लोककलांचे वस्तुसंग्रहालय) उघडावे, अशी कल्पना आहे. त्यांची तशी इच्छा होती. ती पूर्ण होत आहे, हे पाहून त्यांच्या जेजुरीजवळच कऱ्हानदीत विसावलेल्या अस्थींना संतोष होईल.

त्यांचे सारे आयुष्य म्हणजे एक योगायोगच होता. जर्मनीत स्टुटगार्टला जन्मलेला हा गुन्थर लंडनमध्ये शिकून पुण्याच्या लॉ कॉलेजात विद्यार्थी म्हणून यावा आणि स्वतःच्या कर्तृत्वावर पुण्याचे एक भूषण होऊन बसावा, हा एक अपूर्व योगायोगच नाही का? ज्या 'लीळाचरित्रा'चा त्याने ध्यास घेतला होता आणि ज्याचा त्याने कष्टाने केलेला इंग्रजी अनुवाद विमानाच्या प्रवासात हरवला, त्याच 'लीळाचरित्रा'ची पहिली पोथी 'खालसैयाच्या धाडी'त हरवली होती आणि हिराइसेला तिचे आठवणीतून पुनर्लेखन करावे लागले, हाही एक विलक्षण योगायोगच नाही तर काय? मी त्यांना 'लीळाचरित्रा'च्या इतिहासाच्या या पुनरावृत्तीची आठवण करून दिली, तेव्हा त्यांना खूप बरे वाटले आणि ते पुन्हा जोमाने कामाला लागले.

त्यांना जे मरण आले, त्यातही दैवाचाच हात दिसतो. ते प्रत्यक्षात गेले, तो दिवस १ जून, १९९२ होता. पण मृत्यूने त्यापूर्वीच आपली चाहूल दाखवली होती.

ते जेजुरीहून पुण्याला येत असतांना त्यांच्या मोटारीला अपघात होऊन ती उलटीपालटी झाली होती. त्या अपघातातच ते दगावायचे; पण थोडक्यात निभावले. गाडीचा चेंदामेंदा झाला, पण ते वाचले. पण मृत्यूने त्यांचा पाठलाग सोडला नाही. त्यानंतर चारसहा महिन्यांतच ते डोसेनहाइममधील आपल्या घरात एकाकी असताना त्याने त्यांना गाठले आणि कोणालाही न कळवता त्यांचा क्षणार्धात बळी घेतला. ती सर्वच घटना त्यांच्या विश्वाला जबरदस्त हादरा देऊन गेली. 'लीळाचरित्रा'चे भाषांतर चालू आहे व आपण लौकरच पुण्याला येत आहो, हे कळविणारे त्यांचे पत्र मला त्यांच्या मृत्यूनंतर चार दिवसांनी मिळाले. त्या पत्रावर तारीख नाही, पण पाकिटावर जर्मन पोस्टाचा ता. २९-५-९२ असा शिक्का आहे. त्या पत्राचे छायाचित्र पुढे देत आहे.

पत्र

आदरनीय

डा. तुळपुळे यास

नमस्कार

इथं आल्यावर मला पत्र लिहायला
अजीबात वेळ मिळाली नाही म्हणून
माफ करावी.
मी रोज कमीत कमी एक ओळा भाषांतर
करीत आहे.
डॉ. Bühnemann[1] मिचिगन यूनिवर्सिटीत
जागा मिळाली आहे असें मला समजले.
ॲन[2] जुलै 10-च्यानंतर पुण्याला येणार
आहे असं मला वाटते. ती इथं नवीन
खंडोबाचा फिल्म पाहून पुण्याला जाईन.
जुलै 10 तारखेला लुत्सें[3]चा शेवटचा दिवस आहे.
SAI[4] मध्ये म्हणून. या दिवशी नवीन फिल्म दाखवीन.
मी जुलैमध्ये तीसऱ्या की शेवटाच्या ~~दि~~ आठवड्यात
येणार.
आपली तब्यत बरी आहे अशी आपेक्षा आहे.
तुमच्या बायकोचा तब्यत ~~क~~ कशी आहे?
सगळ्यांना नमस्कार सांगा.

आपला

गुंथर.

१. डॉ. गुद्रुन ब्यूनेमन या संस्कृत पंडिता अमेरिकत मिशिगन विद्यापीठात संस्कृत आणि इंडॉलॉजी या विषयांच्या प्राध्यापिका आहेत.

२. ॲन् म्हणजे अमेरिकेतील ॲरिझोना विद्यापीठातील धर्मविषयक अभ्यासाच्या प्राध्यापिका डॉ. ॲन फेल्डहाउस. जेजुरीला डॉ. सोन्थायमर यांचे स्मारक उभारण्यात त्यांचा पुढाकार आहे.

३. प्रो. लोथार लुत्से, हायडलबर्ग विद्यापीठाच्या 'साउथ एशिया इन्स्टिट्यूट'मधून हिंदीचे प्राध्यापक म्हणून नुकतेच सेवानिवृत्त झाले. सध्या ते या इन्स्टिट्यूटच्या दिल्ली शाखेचे प्रमुख म्हणून काम पाहतात. डॉ. सोन्थायमर यांचे निकटचे मित्र आणि सहकारी.

४. SAI म्हणजे South Asia Institute (हायडलबर्ग)

या पत्रातील 'सगळ्यांना नमस्कार' हा त्यांचा अखेरचा रामराम ठरला. नियती किती क्रूर असू शकते, त्याचा पुन्हा एकदा अनुभव आला. ५८ वर्षांच्या या आदर्श संशोधकाचा आणि पुणेकरांच्या मित्राचा बळी घेऊन तिने काय साधले, हा प्रश्न मनात पुन्हा पुन्हा येतो. पण अशा प्रश्नांना उत्तरे नसतात. त्यांचे कार्य पुढे चालू ठेवून त्यांची परंपरा अबाधित राखणे हेच नियतीला दिलेले खरे उत्तर होईल.

डॉ. सोन्थायमर यांना जाऊन आता दोन वर्षांचा काळ लोटला असला, तरी त्यांची स्मृती अजून मनात ताजी आहे. त्यांना आदरांजली वाहण्यास मी मुद्दामच थोडा थांबलो होतो. कारण कोणत्याही मोठ्या माणसाच्या मृत्यूनंतर पाठोपाठ लिहिलेल्या त्याच्याविषयीच्या लेखात भावुकता आणि अतिशयोक्ती यांचे प्रमाण फार असण्याची शक्यता असल्याने काही काळ थांबणे बरे असते. त्याप्रमाणे दोन वर्ष थांबून मी वरील लेख लिहिला आहे. गुरुदेव रानडे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्याविषयी लिहिताना तत्त्वज्ञानाचे अमेरिकन प्रोफेसर जॉर्ज बर्च यांनी म्हटले होते :

'It may be better to wait a year or two. If he still seems great in retrospect, his life can be appraised in a more objective spirit. R.D. Ranade is a man, whose stature in my estimate, has only grown in retrospect.'

वरील उताऱ्यात R.D.Ranade याऐवजी Gunther D. Sonthiemer हे नाव घालून मी तेच म्हणेन. या लेखात त्यांच्या संशोधनकार्याचा तपशील मी दिलेला नाही. तो त्यांच्या शोधपर निबंधांची, ग्रंथांची, आणि चित्रपटांची पुढील यादी स्पष्ट करील. ही यादी त्यांचे विद्यार्थी डॉ. रोनाल्ड यान्सेन आणि डॉ. आदित्य मलिक या दोघांनी मिळून परिश्रमपूर्वक तयार केली आहे. त्यासाठी त्यांना धन्यवाद !

प्रा. बर्च यांनी गुरुदेव रानड्यांच्यावरील लेखाचा समारोप करताना जे म्हटले होते, त्यात त्यांच्या ठिकाणी डॉ. सोन्थायमरचे नाव घालून मी असे म्हणेन, की

'Such a one was Sonthiemer, one of those rare spirits, who show us how fine human nature can be.'

**९५२, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.**

***



अनुक्रमणिका

## Gunther-Dietz Sontheimer, Ph.D. (London), Dr. habil., Dipl. in Law

South Asia Institute, University of Heidelberg (Germany)

**Summary of Academic Career**

Studied and graduated in Law at the University of Tubingen in 1958.

Studied Indology (Sanskrit,Hindi, Indian Philosophy) with Professor Helmuth von Glasenapp (1953-58).

Studied Hindu law and Dharmasastra at the Law College and Bhandarkar Oriental Research Institute, carried out field research in archaeology and folk religion with Professor D.D. Kosambi (1958-61)

From 1961-64 Studies at the School of Oriental and African Studies, University of London. Dipl. in Law, and Ph.D. in Hindu law and Dharmasastra (with Professor J.D.M. Derrett).

From 1966 onwards several stays in India for field research in folk religion, pastrol communities (Dhangars, Gollas, Kurubas) in the Deccan and the interdependence of folk religion and scriptural religion.

Documentation of hero and sati-stones in Maharashtra and Bastar.

1973-75Head of the Branch of the South Asia Institute, University of Heidelberg, New Delhi.

1974 :Dr. habil., University of Heidelberg.

Since 1976 annual stays in Pune, research in folk literature, folk religion and modern and old Marathi language and literature.

1987 : Tagore Literature Prize of the Indo-German Society in Germany.

Present position : Professor and Head Indology III (History of Religion and Philosophy of South Asia.)

Subjects of teaching : History of religion of South Asia, Marathi language and literature.





अनुक्रमणिका

## List of Publications
### Articles

1. Die groBe Reform. In: *Indo-Asia,* April 1959, No. 2,pp. 139-43.
2. Das indische Lichterfest. In : *Indo-Asia,* Oktober 1959,No. 4, pp. 336-8.
3. Brief aus Mysore. In : *Indo-Asia,* Januar 1960, No. 1, pp. 10-12.
4. Die Teilung Bombays. In : *Indo-Asia,* April 1960, No. 2, pp. 107-9.
5. Die "Unberuhrbaren" Indiens. In : *Indo-Asia,* Oktober 1960, No. 4, pp. 323-9.
6. Der indische Familienverband. In : *Indo-Asia,* April 1961, No. 2, pp. 150-4.
7. Recent Developments in Hindu Law. In : *Some Aspects of International Law today.* Publ. as Suppl. to The International and Comparative Law Quarterly, 1964, pp. 32-45.
8. Religious Endowments in India : The Juristic Personality of Hindu Deities. In : *Zeitschrift fur vergl. Rechtswissenschaft,* vol. 67, 1964, pp. 45-100.
9. XVI. Deutscher Orientalistentag in Heidelberg. In : *Kairos,* VII./1965, No. 4, pp. 319-21.
10. Some Notes on Biroba, the Dhangar God of Maharashtra. In : *D.D. Kosambi Commemoration Volume, Science and Human Progress,* Bombay, 1974, pp. 167-74.
11. Staat, Recht und Religion in Indien. In : *Internationales Asienforum,* vol. II, 1971, pp. 146-58.
12. Recht und Religion in Indien. In : *Zeitschrift fur vergl. Rechtswissenschaft,* vol. 71, 1970, pp. 141-55.
13. Features of Localization in Contemporary India Fiction : Marathi In : *South Asian Digest of Regional Writing,* Vol. 1, 1972, pp 32-46.
14. The Dhangars : A Nomadic Pastoral Community in a Developing Agricultural Environment. In : *Pastoralists and Nomads in South Asia* Ed. with L.S. Leshnik, Wiesbaden, 1975, pp. 139-70.
15. Eine Tempellegende der Dhangars von Maharashtra. In : *Mundliche Uberliferungen in Sudasien.* Ed. by H. Berger, Schriftenreihe des Sudasieninstituts, vol. 17, Wiesbaden, 1975, pp.

82-110.

16. Fiel Research in Maharashtra : The History of some Pastoral Communities and their Cults. In : M.S. Mate, Prof. G.H. Khare (eds.), *Felicitation Volume,* Poona, 1976, pp. 264-71.
17. Dharma - and Arthasastra Studies in Germany. In : *International Sanskrit Conference. March 26th - 31st 1972.* Ed. by V. Raghavan, vol. I.2, Delhi, 1979, pp. 664-72.
18. Some Memorial Monuments in Western India. In : *German Scholars on India.* Ed. by the Embassy of the FRG in New Delhi, Vol. II Delhi, 1976, S. 264-75.
19. The Making of a Poem (Marathi). In : *South Asian Digest of Regional Writing,* vol. 2, 1973, pp. 125-53.
20. Religion in Modern Marathi Literature : Some Trends and Voices. In : *South Asian Digest of Regional Writing,* vol. 3, 1974, pp. 53-78.
21. The Hero- and Sati-Stones of Maharashtra. In : *Memorial Stones of India.* Ed. with S. Settar, Dharwar/New Delhi, 1982, pp. 261-81.
22. On the Memorials to the Dead in the Tribal Area of Central India. In : *Memorial Stones of India.* Ed. With S. Settar, Dharwar/ New Delhi, 1982, pp. 87-99.
23. The Prehistoric Background to Pastoralism in the Southern Deccan in the Light of the Oral Traditions and the Cults of Some Pastoral Communities. In : *Anthropos* 75 (1980). Ed. with M.L.K. Murty, pp. 163-84.
24. The "Pious Obligation" - A Traditional Legal Institution and Its Modern Judicial Interpretation. (unpubl.)
25. Der Familienverband als Landeigentumer im Hindu-Recht. (unpubl).
26. The Religion of the Hatkar Dhangars. In : E. Zelliot, M. Berntsen (eds.), *The Experience of Hinduism. Essays on Religion in Maharashtra.* State University of New York Press, Albany, 1988, pp. 109-130.
27. Ein Dorf in der Durrezone Maharashtras. In : *Indo-Asia,* No. 21, 1979, pp. 158-66.
28. Biography and Autobiography in Marathi Literature : An Introduction. In : *South Asian Digest of Regional Writing,* vol. 5,





अनुक्रमणिका

1979, pp. 54-56.

29. Gerichtsverfahren und Richter im traditionellen indischen Recht. In : Th. Viehweg, R. May (eds.), *Beitrage zu indischem Rechtsdenken.* (Beitrage zu nicht-europaischen Rechtsheorien, 1), Wiesbaden, 1979, pp. 59-85.

30. Der Befriff des Eigentums im Hindurecht. In : Th. Viehweg, R. May (eds.), *Beitrage zu indischem Rechtsenken.* (Studien zu nichteuropaischen Rechtsheorien, 1), Wiesbaden, 1979, pp. 87-106.

31. Die Ethik im Hinduismus. In : *Ethik der Religionen. Ein Handbuch. Primitive, Hinduismus, Buddhismus, Islam, Alter Orient.* Ed. by C.H. Ratschow, Stuttgart, 1980, pp. 349-436.

32. Some Incidents in the History of the Khandoba. In : M. Gaborieau, A. Throner (eds.), *Asie du Sud. Traditions et changements.* VIth European Conference on Modern south Asian Studies 1973, Paris, 1979, pp. 11-117.

33. The Dasara Festival at Devaragudda (Karnataka) : Ritual and Dramatic Performance in the cult of Mailar. In : *Asie du Sud. Traditions et changements,* Colloques Internationaux du Centre National de la Recherche Scientifique. Paris, 1979, pp. 111-117.

34. The Mallari/Khandoba Myth as Reflected in Folk Art and Ritual. In : *India and the West, Proceedings of a Seminar. Dedicated to the Memory of H. Goetz.* Ed. by J.Deppert Delhi, 1983, pp. 239-51.

35. King Vikram and Kamalu Sinde, the Shepherd, Bhakti Episodes from an Oral Epic of the Dhangars of Maharashtra. In : *South Asian Digest of Regional Writing,* vol. 6, 1977, pp. 97-128.

36. The vana and the ksetra : On the Tribal Origins of Some Famous Cults. In : G.C. Tripathi, H. Kulke (eds.) *Eschmann Memorial Lectures,* vol. I (1978-1986), Eschmann Memorial Fund, c/o Dept. of History, Utkal University, Bhubaneswar - 4, 1987, pp. 117-164.

37. Gopalanca deva Sri Vitthala (in Marathi) In : G.M. Kulkarni, V.T. Shete (eds.), *Maharastract Satvadhara.* Festschrift in honour of Prof. R.C. Dhere, Poona, 1981, pp. 103-12.

38. Das Tier im Hinduismus. In : *Tropisch-Asien.* Publikation des Zoologischen Instituts der Universitat Heidelberg, 1983.

39. God, Dharma and Society in the Yadava Kingdom of Devagiri

According to the Lilacaritra of Cakradhar. In :*Indology and Law. Studies in Honour of J. Duncan M. Derrett.* Ed. with P.K. Aithal, Wiesbaden, 1982, pp. 329-58.

40. Folk Deities in the Vijayanagara Empire : Narasimha and Mallanna. In : *The Kingdom of Vijayanagara. Int. Vijayanagara Seminar in Heidelberg, July 1983.* Ed. by A.L. Dallapiccola, St. Zingel-Lallemant, Wiesbaden, 1985, pp. 144-58.
41. Caturvarnya, Bhakti und der Aufstieg von Volkskulten in Maharashtra : Religionsgeschichtliche Skizze einer Region. In : H. Kulke, D. Rothermund (eds.), *Die regionalen Traditionen Indiens,* Wiesbaden, 1985, pp. 129-48.
42. The Power of Valour and Sacrifice. Memorials of Heroes, Satis, and Ancestors in Maharashtra. In : *Marg* (unpublished).
43. Rudra and Khandoba : Continuity in Folk Religion. In : M. Israel, N.K. Wagle (eds.), *Religion and Sciety in Maharashtra,* Tornonto, 1986, pp. 1-31.
44. Hinduism : The five Components and their Interaction. In : *Hinduism Reconsidered. Proceedings of the Panel on "Hinduism Reconsidered" IXth European Conference on Modern South Asian Studies.* Ed. by G. Sontheimer, H. Kulke, New Delhi, 1989, 2nd edn. 1991, pp. 195-210.
45. Bhakti in the Khandoba Cult. In : *Devotion Divine. Bhakti Traditions from the Regions of India.* Ed. by D.L. Eck and F. Mallison, Groningen/Paris, 1991, pp. 231-254.
46. Keshav Meshram's Hakikat ani Jatayu : An Example from the Dalit Literature of Maharashtra. In : *South Asian Digest of Regional Writing,* vol. 11, 1985, pp. 105-116.
47. Das Zeitalter der Indo-Arier und Draviden. In : *Borsenblatt* 68/26.8.1986.
48. God as the King for All : The Sanskrit Mallari Mahatmya and its Context. In : *The History of Sacred Places as Reflected in Traditional Literature.* Ed. by Hans Bakker, Leiden, 1990, pp. 103-130.
49. Between Ghost and God : A Flok Deity of the Deccan. In : *criminal Gods and Demon Devotees : Essays on the Guardians of Popular Hinduism.* Ed. by Alf Hiltebeitel, Albany, N.Y. : State University

Press, 1989.

50. Die Wallfahrt nach Pandharpur und das Ganpati-Fest : Harmonie und Konflikt im heutigen Maharashtra. (Lecture, in press)

51. Das Fest in Indien : Jagdausflug des koniglichen Gottes Khandoba In : *Das Fest und das Heilige. Studien Zum Verstehen fremder Religionen.* Ed. by J. Asmann and Th. Sundermeier, Gutersloh, 1991, pp. 54-68.

52. The Myth of the God and his Two Wives : Two Pastoral Versions from Maharashtra. In : *Living texts from India.* Ed. by R.K. Barz and M. Thiel-Horstmann, Wiesbaden, 1989, pp. 7-62.

53. The Ramayana in Contemporary Folk Traditions of Maharashtra. In : *Ramayana and Ramayanas.* Ed. by M. Thiel-Horstmann Wiesbaden, 1991, pp. 115-137.

54. Der Khandoba-Kult von Maharashtra als Spiegel des Hinduismus. In : *Indien in Deutschland. Vortrage und Aufsatze bei der Deutsch-Indischen Gesellschaft Darmstadt* 1959-1989. Frankfurt, 1989.

55. "Natur" und "Kultur" in der Weltsicht des Hinduismus. In : *Die Schopfung in den Religionen.* Ed. By Bernhard Mensen SVD, Nethetal : Steyler Verlag, 1980, pp. 33-46.

56. King Khandobas hunt and his encounter with Banal, the Shepherdess. In : *Gods on earth : Contributions to the Study of Indian Folk Culture.* Ed. by H. Bruckner, L. Lutze, and A. Malik. (tentative title, in press)

57. The Place of time in the Culture of the Hatkar Dhanagars of Maharashtra. In : *Kala.* Ed by K. Vatsyavan, Delhi, Indira Gandhi National Museum.

## Reviews

1. S.V. Gupte, Hindu Law of Succession, Bombay 1963. In : *The International and Comparative Law Quarterly,* vol. 13, part 2, 1964, pp. 751-2.

2. S.V. Gupte, Hindu Law of Marriage, Bombay 1961. In : *Rabels Zeitschrift fur auslandisches und internationales Privaterecht,* 28/1964, No.4, pp. 772-4.

3. R.L. Chaudhari, Hindu Woman's Right to Property. (Past and

Present), Calcutta 1961. In : *Rabels zeitschrift fur auslandisches und internationales Privatrecht,* 28/1964,No.4, pp. 772-4.

4. J.D.M. Derrett, History of Indian Law (Dharmasastra). Handbuch der Orientalistik, 2. Abt. : Indien. Ed. by J. Gonda. vol. 3 : Geschichte. 1. Abschnitt. In : OLZ 5 (1978) pp. 490-1.
5. J.D.M. Derrett, Dharmasastra and Juridical Literature. In : *A History of Indian Literature,* Ed. by J. Gonda, vol. V. part 1, Wiesbaden, 1973. In : *OLZ,* 5 (1978),pp. 490-2.
6. M. Thiel-Horstmann (ed.), Bhakti in Current Research, 1979-1982, Berlin, 1983. In : *Anthropos* 80 (1985) pp. 749-51.
7. Dalmia, Yashodhara. The Painted World of the Warlis. Art and Ritual of the Warlis Tribes of Maharashtra. New Delhi : Lalit Kala Akademi, 1988. In : *Anthropos* 85 (1990) 584-86.
8. Preston, Laurence W., The Devs of Cincwad. A Lineage and the State in Maharashtra. Cambridge 1989. In : *Anthropos* 85 (1990) 636-38.

### 16mm Films for the German TV and Educational Purposes

1. King Khandoba. Scenes from the Life of an Indian Folk God. (in German and English; in collab. with Gunter Unbescheid.)
2. Vari-An Indian Pilgrimage (in German and English; in colla. with H. Stegmuller).
3. Gott Biroba gab uns die Schafe (in German; in collaboration with Marie van de Loo und H. Stegmuller).
4. The Somvati Amavasya Festival in the Khandoba cult.

Introductions : S. G. Tulpule, Mysticism in Medieval India Wiesbaden, 1984.

### Translations

1. Prem Chand, Die Prufung. (Transl. from Hindi). In : H.V. Glasenapp, *Indische Geisteswelt,* vol. II. 1959, pp. 144-7.
2. Vyankatesh Maduglkar, The Pilgrimage. (Transl. from Marathi). In : *South Asian Digest of Regional writing,* vol. 3, 1974, pp. 105-11.
3. Durga Bhagawat, The Vithoba of Pandhari. (Transl. from Marathi) In : *South Asian Digest of Regional Writing,* vol. 3, 1974. pp. 112-20.

4. Vyankatesh Madgulkar, Das Dorf hieB Bangarvadi. (Transl. from Marathi). Freiburg, 1986.
5. Keshav Meshram, Jatayu. (Translation of Marathi novel, to be published).

## Monographs

1. The Concept of Daya : A Comparative Study. (Academic Postgradute Diploma Dissertation), London, 1962.
2. The Joint Hindu Family : Its Evolution as a Legal Institution. (South Asian Studies, vol. 7), Delhi, 1977.
3. Biroba, Mhaskoba und Khandoba : Ursprung, Geschichte und Umwelt von pastoralen Gottheiten in Maharashtra, Wiesbaden, 1976. [Tr. into English by Anne Feldhaus, Pastoral Deities of Western India, New York, Oxford, OUP, 1989].

***

## कानी पडलेला संवाद

एका बाईंनी आपल्या घराभोवतीच्या छोट्याशा अंगणात तीन नारळाची झाडं लावली. झाडामाडांवर प्रेम करणाऱ्या एका वयस्कर गृहस्थांच्या हस्ते त्यांनी ती लावून घेतली व नंतर विचारलं,

'येतील ना, हो, नारळ या झाडांना ?'

त्यावर ते कोकणातील गृहस्थ म्हणाले,

'आमच्याकडे एक म्हण आहे :

लागे, ते न लागे

न लागे, ते लागे.'

'म्हणजे, हो, काय ?' त्या बाईंनी विचारले.

त्यांनी अर्थ सांगितला, तो असा :

झाड वाढल्यावर त्याची पानं एकमेकांना लागत असतील, तर त्याला फळं लागत नाहीत, ज्या झाडांचा पर्णसंभार एकमेकांना खेटत नाही, त्या झाडांना भरपूर फळं लागतात.

थोडक्यात, योग्य अंतरावर लावलेली झाडं चांगली वाढतात.

**प्रेषक : विजया देव**

# ‘एकच प्याल्या’ची भाषा

विनायक गंधे

आजवर गडकरीअभ्यासकांनी त्यांच्या नाटकातील भाषेचा जो विचार केला आहे, तो स्थूल स्वरूपाचा आहे. त्यामुळे गडकऱ्यांच्या एकूणच नाट्यभाषेचा चिकित्सक अभ्यास होण्याची आवश्यकता आहे. येथे ‘एकच प्याल्या’च्या भाषेचा सविस्तर परामर्श घेऊ.

गडकऱ्यांची भाषा हे मराठी भाषेचे सांस्कृतिक संचित ठरले आहे. ती मराठी भाषेचे वैभव ठरली आहे. गडकऱ्यांच्या नाटकातील भाषावैभव जुन्या-नव्या सर्वच अभ्यासकांना मोहविते. गडकऱ्यांच्या भाषेचा प्रभाव मराठी साहित्यावर- विशेषतः नाटकाच्या भाषेवर मोठ्या प्रमाणात दिसतो. गडकऱ्यांच्या भाषेची वळणे साहित्यात लोकप्रिय झाली. त्यांच्या सुभाषितसदृश काव्यमय भाषेला पुढील काळातील वाचकांनी दाद दिली. गडकऱ्यांच्या नाटकांचे प्रयोग आज विरळ झाले असले, तरी जनमानसात ही भाषा स्थिरावली आहे. तिच्या चमकदार आणि अर्थसंपृक्त रूपाने मराठी वाचकांच्या मनांत तिने कायमचे स्थान मिळविले आहे. गडकऱ्यांच्या नाटकांच्या लोकप्रियतेत ‘भाषा’ हे एक बलवत्तर कारण आहे.

‘एकच प्याल्या’च्या भाषेचा विचार करण्यापूर्वी नाट्यभाषेचे वेगळेपण लक्षात घेऊ. गडकरीपूर्व व गडकरीकालीन नाटकात नाट्यभाषेबाबत जे समज दिसतात, ते काही अपवाद वगळता बाळबोध स्वरूपाचे दिसतात. नाटकाची भाषा, व्यावहारिक भाषेहून वेगळी आहे, असे नाटककार मानीत. पण प्राधान्याने कृत्रिम भाषा, भडक भाषा म्हणजे नाटकाची भाषा, असा आपल्या नाट्यसृष्टीत दीर्घकाळ समज दिसतो. काव्य म्हणजे अलंकारांची रेलचेल व विनोद म्हणजे कोटिबाजपणा हे श्री. कृ. कोल्हटकरांसारख्या नाटककाराचे समज होते; आणि प्रेक्षकांतही ते रुजलेले होते. नाट्यभाषेकडून प्रेक्षकांची यापेक्षा वेगळी अपेक्षा नव्हती. नाटककारही आपल्या कृत्रिम व भडक लेखनाने नाट्यभाषेबाबत प्रेक्षकांचे समज पक्के करीत होते.

विष्णुदासी भाषा परंपरागत संस्कृतनिष्ठ आणि कृत्रिम आविर्भाव प्रकट करणारी होती. संस्कृत भाषासरणी आणि प्रतिष्ठित लौकिक मराठीचे एक नाटकी स्वरूपाचे मिश्रण या भाषेत होते. विविध परकीय नाट्यकृतींचे अनुवाद करणाऱ्यांची नाट्यभाषा सर्वसाधारपणे नाटकी स्वरूपाची आहे. उर्दू-पारशी रंगभूमीच्या प्रभावाने मराठी नाटकांची भाषा अधिक प्रदर्शनप्रिय आणि आलंकारिक स्वरूपाची झाली. देवलांसारखा नाटककार अपवाद केल्यास गडकरीपूर्व काळात नाट्यभाषेचा तिच्या वेगळेपणाची जाण ठेवून जाणकारीने उपयोग अन्य नाटककरांनी

केलेला दिसत नाही. नाटकाची भाषा ही नित्याच्या लौकिक जीवनातील भाषेहून वेगळी असते, हे पारंपरिक दृष्टिकोनातही गृहीत धरले होते; पण नाट्यभाषेच्या वेगळेपणाचे भान त्यामध्ये नव्हते. नाट्यभाषा कशासाठी अवतरते, याचा गांभीर्याने विचार गडकरीकालीन नाटककारांमध्ये देवलांशिवाय अन्य कोणी केलेला आढळत नाही.

नाटकाची भाषा ही व्यावहारिक भाषेहून वेगळी असते. व्यावहारिक भाषा आणि नाट्यभाषा या दोन्हींचा उद्देश विचार-प्रकटीकरण आणि भावना-प्रकटीकरण असा असला, तरी व्यावहारिक भाषा विस्कळीत स्वरूपाची, पुनरुक्त आणि पाल्हाळिक असू शकते. विशिष्ट वेळात नाटक सादर करावयाचे असल्याने नाट्यभाषा आटोपशीर, पुनरुक्त न होणारी व एकसंध स्वरूपाची असणे आवश्यक असते. व्यावहारिक भाषा वैयक्तिक स्वरूपाची असते. पण नाटकातील पात्रांची भाषा केवळ वैयक्तिक असून चालत नाही. लौकिक जीवनातील व्यक्तींमध्ये संभाषण असते. पण नाटकातील व्यक्तींमध्ये नाट्यसंवाद (डायलॉग) असावा लागतो. नाटकातील संवादात फक्त रंगभूमीवरील बोलणारा व ऐकणारा यांच्यांतील देवघेव नसते, तर हे संवाद ऐकणारे प्रेक्षागृहातील श्रोते गृहीत धरलेले असतात. नाटकातील पात्रे आपसांत बोलण्याबरोबर प्रेक्षकांना कळावे, म्हणून बोलत असतात. त्यामुळे व्यावहारिक भाषेपेक्षा नाटकाच्या भाषेला एक वैशिष्ट्यपूर्ण रूप येते. नाटकाला केवळ श्राव्य मूल्य नसते, तर दृश्य मूल्यही असते. परिणामतः प्रयोगाच्या दृष्टीने नाटकाच्या भाषेला व्यापक कार्य असते. नाट्यसंहितेतील लिखित शब्द रंगमंचावर जेव्हा उच्चारला जातो, तेव्हा तो अनेकविध परिमाणे साधणारा असावा लागतो. नाटकातून अनेक गोष्टी साध्य करण्याच्या दृष्टीने नाटककार आपल्या भाषेची योजना करीत असतो.

आपल्या भाषेच्या परिणामकारक उपयोजनाने नाटककार कथानक गतिमान करतो. विविध पात्रांच्या मनोगतांतून तो त्यांचे वेगळेपण सिद्ध करतो. नाटककाराची भाषा प्रेक्षकांना नाट्यवस्तूशी खिळवून ठेवण्याचे काम करते. पात्रानुसार, प्रसंगानुसार या भाषेला लवचीक रूप धारण करावे लागते. ही भाषा जशी घरगुती, तशी वक्तृत्वपूर्ण असते. भावनोत्कट असते, तशी आलंकारिक असते. नाटककाराला आपला भावानुभव नाट्यरूप बनवून प्रेक्षकांपर्यंत पोहोचवायचा असतो. नाटककाराला आपल्या अनुभवाचे अर्थपूर्ण प्रकटीकरण करावयाचे असते. त्यासाठी तो समाजजीवनातील भाषा घेतो व प्रतिमा, प्रतीक आणि अलंकरणाच्या साहाय्याने ती समृद्ध करीत असतो. प्रेक्षकाला समृद्ध नाट्यानुभव देणारी भाषा प्रयोजक म्हणजे कार्यप्रवण स्वरूपाची म्हणता येईल. प्रयोजक भाषा नाट्यानुभवाशी एकरूप होते. नाटकात तिचे वेगळेपण जाणवत नाही. प्रयोजक भाषा पात्रांच्या स्वभावविशेषांनुसार व्यक्त होते. नाटकातील भावानुभवाशी समर्पक असते. तिच्यात बोली भाषेचा रसरशीतपणा असतो.

अशी भाषा नाटकात आपले वेगळे अस्तित्व दाखवीत नाही, ती नाट्यानुभवाशी एकरूप होते. अशा भाषेला सफल नाट्यभाषा म्हणता येईल. याउलट, शोभादायक म्हणजे डेकोरेटिव्ह नाट्यभाषा होय. ही भाषा अधिक प्रदर्शनीय असते. तिला अलंकरणाचा सोस असतो. नाट्यानुभवाशी ती बऱ्याचदा फटकून वागते. व्यक्तिरेखांशी अथवा नाट्यप्रसंगांशी ती सुसंगत राहतेच, असे नाही. नाट्यानुभवाची प्रतीती देण्यास अशी भाषा अपुरी पडते. गडकरीकालीन नाट्यसृष्टीत शोभादायक भाषेचेच वर्चस्व दिसते. मराठी नाट्यसृष्टीत १९२० पर्यंतच्या कालखंडातील भाषा बरीचशी कृत्रिम आणि नाटकी स्वरूपाची आहे. नाटकाच्या भाषेचे हे विशेष लक्षात घेऊन 'एकच प्याल्या'च्या भाषेची आपल्याला मीमांसा करता येईल.

'एकच प्याल्या'च्या भाषेचे काव्यदृष्ट्या आणि व्याकरणदृष्ट्या वर्गीकरण करून, यातील विविध घटकांच्या वापराने 'एकच प्याल्या'च्या भाषेचे स्वरूप पाहता येईल.

**या भाषेची काव्यदृष्ट्या मीमांसा -**

'एकच प्याला' ही भीषण शोकांतिका आहे. शोकांतिकेतील पात्रांची भाषा उत्कट व काव्यमय असते. सिंधु व सुधाकर या प्रमुख व्यक्तिरेखांची भाषा अनेकदा याचा प्रत्यय देते. सिंधु व सुधाकर या दोघांच्या काव्यमय भाषेचा आविष्कार भिन्न स्वरूपाचा आहे. सिंधूची भाषा बऱ्याच ठिकाणी अनलंकृत आणि बोली भाषेचे चैतन्य घेऊन व्यक्त होते. याउलट, सुधाकराची भाषा वक्तृत्वपूर्ण आणि आलंकारिक होते. 'एकच प्याल्या'मधील गौण पात्रे बऱ्याच वेळा व्यावहारिक आणि खटकेबाज भाषा वापरतात. मुख्यतः सिंधु व सुधाकर या दोन भिन्न प्रकृतींच्या व्यक्तिरेखांमुळे ही भाषा दोन तऱ्हांनी आविष्कृत होताना दिसते. १) गद्य भाषेच्या स्वाभाविक लयीचा आविष्कार २) आलंकारिक, कृत्रिम पण लयबद्ध आविष्कार. भाषेच्या स्वाभाविक लयीचा आविष्कार म्हणून सिंधूचे पुढील संभाषण लक्षणीय आहे.

"पूर्वजन्मी केलं, ते कपाळी उमटलं. मागल्या जन्मी उपाशी ब्राह्मण ताटावरून उठवला असेल, म्हणून आज अन्नासाठी दाही दिशा पाहणं आलं. अतीथ-अभ्यागताला रित्या हाती दवडलं असेल, म्हणून घरची लक्ष्मी पारखी झाली. हिरव्या कुरणातून गाईगुजीला हाकललं असेल, तेव्हा आज बाळाला दूध मिळत नसेल. आमचं संचित खोटं, तिथं तुझ्याकडं काय बरं गाऱ्हाणं आणायचं !" (अं ४ प्र. ५)

सिंधूचा दैववाद आणि दुःखस्वीकार अशा अकृत्रिम, हृदयंगम शब्दांत व्यक्त होतो. उपाशी बाळाची सिंधूने घातलेली समजूत विविध प्रतिमा-प्रतीकांमधून येते; पण त्या प्रतिमा आणि प्रतीके भावानुभवाशी एकजीव होतात.

सिंधूचा आणखी एक संवाद असाच उत्कट आहे.

"चतुर्थीचा उपवास लागला, वाटतं, चिमण्या चंद्राला ! आता का बरं काजळकाठ भिजवितोस असा ? मागितल्या वेळी दूध मिळायचे दिवस, राजसा, आता आपले नाहीत, रे ! आपल्या लेखी गोकुळच्या गोठणी ओस पडल्या." (अं. ४ प्र. ५)

भावकवितेची अल्पाक्षररमणीयता आणि अनेक-संदर्भ-सूचकता वरील उताऱ्यास लाभली आहे. ही भाषा सिंधूच्या व्यक्तिमत्त्वाचे स्फटिकवत दर्शन घडविते. नाट्याशय संपन्न करण्यास ही काव्यमय भाषा उपकारक ठरली आहे.

उत्कट, सताल गद्य म्हणून सिंधूचे पुढील बोलणे लक्षणीय आहे.

"अर्ध्या डावावरून लक्ष्मी उठून गेली आणि आपल्या हाती कवड्या राहिल्या. आपलाच हातगुण, त्याला कोण काय करणार ? दोन प्रहर टळायला तर पाहिजे. ज्यांचे तेच बघायला समर्थ का नव्हते ? पण देवाघरी चोरी केलेली. त्यानं असं मनी योजलं..." (अं. ४ प्र. २)

वरील गद्यखंडाची अधिक मीमांसा करून नाट्यभाषा म्हणून ही भाषा कितपत सफल आहे, ते पाहू. सुधाकराच्या वाढत्या व्यसनाने मोठी विपन्नावस्था आली असताना सुधाकरानेच घातलेल्या शपथेने सिंधूने घर चालविण्यासाठी मोलाची कामे सुरू केली आहेत. गीता तिला कागदाच्या घड्या घालणे, दळण अशी बाहेरून कामे आणून देते. बघता बघता उजाड होऊ लागलेला सिंधूचा संसार तिने पाहिलेला आहे. सिंधूसाठी दळणासारखे मोलाचे काम आणणे तिला अवघड वाटते. 'लक्ष्मीशी सारीपाट खेळण्यात तुमचा जन्म गेला असेल... आणखी आता हे काम करायचं !' या गीतेच्य व्यथित प्रश्नांवर सिंधूने जे उत्तर दिले, ते वरील उताऱ्यात आहे. गीतेने उल्लेखिलेल्या लक्ष्मीच्या सारीपाटाचाच संदर्भ ती देते. या संसाररूपी सारीपाटाच्या डावात ही लक्ष्मी उठून गेली आणि हातात कवड्या राहिल्या. यातील द्व्यर्थी योजना हृदयंगम आहे. आज आलेल्या दारिद्र्याची आणि कवड्यांची ती सांगड घालते. प्राप्त परिस्थितीबद्दल ती आपल्यालाच दोष देते. सुधाकराला चुकूनही दोष देत नाही. 'आपलाच हातगुण' यातून आपल्या दुर्दैवाचा तिला उल्लेख करावयाचा आहे. 'ज्यांचे ते बघायला समर्थ का नव्हते.' या वाक्यातून तिचा सुधाकराच्या कर्तृत्वाबद्दल विश्वास आणि आदर प्रकट होतो. आपल्या वाट्याला आलेला दुःखभोग सुधाकरामुळे आलेला नाही, असे तिला वाटते. 'देवाघरी चोरी केलेली,' असे ती म्हणते. चोरी कोणी केली ? सुधाकराने, की तिने ? हा प्रश्न या मनोगतात संदिग्धच राहिला आहे. एरव्ही हौस का होती कुणाला ? या वाक्यातून सिंधूचा प्राप्त परिस्थितीचा समंजस स्वीकार दिसतो. या तीन-चार वाक्यांमधूनही सिंधूच्या उमद्या, उदार मनाचे स्वच्छ दर्शन घडते. सिंधूच्या या छोट्या वाक्यांतून येणारा सताल गद्याचा प्रत्ययही लक्षणीय आहे. उदा., आपलाच हातगुण, त्याला कोण काय करणार ?' या वाक्यातील पहिल्या अर्ध्या वाक्यांशांचा तोल पुढील वाक्यांशाने संभाळला आहे. 'पण

देवाघरी चोरी केलेली; त्यानं असं मनी योजलं' या दोन साध्या, वाक्यांमध्ये अशीच तालबद्धता आहे. सिंधूच्य प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचे दर्शन या साध्या घरगुती भाषेतून होते. या तालबद्ध भाषेने सिंधूच्या व्यक्तिमत्त्वाचा डौलही संभाळला आहे. म्हणून सिंधूची ही भाषा सफल नाट्यभाषा बनते.

सुधाकराच्या संभाषणातूनही गडकऱ्यांनी सताल गद्याचे उपयोजन केले आहे. पण सुधाकराची भाषा वक्तृत्वपूर्ण आणि पांडित्यपूर्ण आहे. ती आलंकारिकही आहे. सुधाकराने मदिरेला केलेल्या आवाहनात या गोष्टींचा प्रत्यय येतो.

"ये, मदिरे ! मदिरे, तू देवता नाहीस, हे नव्यानं सांगायला जगातल्या पंडितांचा तांडा कशाला हवा ? तुझ्या जुलमी जादूनं जडावलेल्या जनावराला सुद्धा कळतं, की तू एक राक्षसी आहेस. तू घातकी राक्षसी आहेस. तू क्रूर राक्षसी आहेस. पण तू प्रामाणिक राक्षसी आहेस. गळा कापीन, म्हटल्यावर तू गळाच कापीत आली आहेस." (अं. ४ प्र. ४)

सुधाकराची वरील भाषा आलंकारिक आणि वक्तृत्वपूर्ण आहे. कृत्रिम असूनही तिच्यात परिणामकारकता आहे. ती आशयाचा प्रभाव पाडते. बऱ्याचदा कृत्रिम आणि आलंकारिक बोलणारा सुधाकर क्वचित अनलंकृत आणि स्वाभाविक भाषा वापरतो. ती कशी हृदयंगम ठरते, ते पुढील उताऱ्यावरून सांगता येईल.

'सकाळची सिंधूची आनंदी मुद्रा, ते आनंदाश्रू, मिटून चाललेल्या माझ्या डोळयांतली, अखेरच्या आशेची ती निस्तेज लकाकी, वेड्या आशेच्या भरात, आम्ही दोघांनी चुंबने घेतल्यामुळे बाळाच्या कोवळया गालांवर आलेली लाली-भाई, आमच्या चिमुकल्या जगातला तो शेवटचा आनंद, तो आनंद-जाऊ दे या एकच प्याल्यात.' (अं. ४. प्र. ४)

आपल्या हातून जीवनातील एक सुंदर क्षण निसटल्याची एक व्याकूळ जाणीव या वाक्यांतून सहजपणे व्यक्त झाली आहे. सिंधु सुधाकराप्रमाणेच गीता आणि रामलाल यांची भाषा स्वाभाविक आणि कृत्रिम होते. सिंधूच्या मृदू आणि सोज्ज्वळ भाषेसमोर गीतेच्या भाषेचा ठसका लक्षात घेण्यासारखा आहे. गीतेची भाषा घरगुती आहे, तिला बोलीचा ठसका आणि चैतन्य प्राप्त झाले आहे. गीतेचा पुढील उतारा या दृष्टीने लक्षणीय आहे.

"हे, हो, कसले देव ? अहो, हे शेंदूरकमी देव, निव्वळ दगडधोंडे. आणि यांच्यावरचा शेंदूर पिऊन मुळूमुळू रडत बसायचं... मला कुणी राज्य दिलं, तर मी साऱ्या बायकांना सांगून ठेवीन, की नवरा दारू पिऊन घरी आला, तर खुशाल त्याला दाव्या दोरखंडानं गोठ्यात नेऊन बांधीत जा. नवरा म्हणे देवासारखा. अशानं तर नवरेपणाचे देव्हारे माजले. दारू पितो, तो कसला हो नवरा ? माणसात देखील जिम्मा व्हायची नाही त्याची." (अं. ४ प्र. २)

गीतेची ही परखड भाषा तिची व्यक्तिरेखा स्पष्ट करणारी आहे. सिंधूच्या संभाषणाला ती विरोधी नाट्यात्म परिमाण देते. तिची भाषा काव्यमय नाही; पण स्वाभाविक आहे. तिच्या सहजोर्मी त्यातून प्रकट झाल्या आहेत. गीतेच्या उलट रामलालची भाषा विलक्षण पल्लेदार आणि कृत्रिम आहे. रामलालचे एखादे दीर्घ वाक्य याची साक्ष देईल.

'पराक्रमी पुरुषार्थानं मिळविलेली सत्ता मोकळेपणाच्या उदारपणानं मर्यादित करण्याचा आम्हांला सराव नसल्यामुळं दैवयोगानं प्राप्त झालेली अल्प सत्ता दुबळ्या जिवावर आम्ही सुलतानी अरेरावीनं गाजवीत असतो.' (अ. ५ प्र. ३)

दीर्घ वाक्यांची, ग्रांथिक शब्दांचा वापर करणारी ही भाषा फारशी सफल नाट्यभाषा ठरत नाही. प्रसंगानुसार, पात्रांनुसार बऱ्याच वेळा गडकऱ्यांची नाट्यभाषा विशिष्ट आकार घेत असली, तरी गडकऱ्यांच्या वाङ्मयीन प्रकृतीचे काही विशेष या भाषेतून पुनःपुन्हा डोकावताना दिसतात. आपली भाषा काव्यमय आणि उत्कट करण्यासाठी गडकरी पुढील काही विशेष आपल्या भाषेतून आणतात.

### साम्यावर आधारित प्रतिमानांपेक्षा विरोधी प्रतिमानांचा अधिक वापर

साम्यावर आधारलेली प्रतिमाने किंवा रूपकात्मकता पुढील उदाहरणांत दिसते :

१) माझ्या पाषाणहृदयावर रामलालच्या गतउपकारांचे शिलालेखच पाहायला मिळतील (अं. १ प्र. १)

२) मानस सरोवरात उत्पन्न झालेल्या, डोळ्यांतून बाहेर येणाऱ्या आणि गालावरच्या गुलाबी समुद्राला मिळणाऱ्या टीचभर गंगा-यमुना तुडवून जाणे हे कोणालाही अजून साधले नाही. (अं. १ प्र. १)

३) . उल्का मातीत मिसळून दगडा धोंड्याच्या पंक्तीत बसतो, याचा दोष त्याच्या स्वतःच्या अधःपाताकडे आहे. (अं. ४ प्र. ३)

४) फळ पिकण्यापूर्वी पाडानं रंगून जातं; पण पुरतेपणी कुजल्याखेरीज त्याला कधी घाण सुटली आहे का? (अं. ३ प्र. १)

अशी काही साम्यावर आधारलेली प्रतिमाने आहेत. पण 'एकच प्याल्या'मध्ये सुधाकराच्या तोंडी विरोधी प्रतिमाने अधिक प्रमाणात येताना दिसतात आणि विरोधी कल्पना व विरोधी प्रतिमाने हे गडकऱ्यांचे खरे वैभव आहे. हे 'एकच प्याल्या'मधून जाणवते.

१) शरीराचा नाश केल्यावाचून मरणाची जोड देणारं एखादं विष नाही का? (अं. १ प्र. ५)

जग इतके चमत्कारिक आहे, की त्यातल्या नुसत्या चांगल्या गोष्टींचीच अपेक्षा करायला निरंतर नुसत्या दुःखात दिवस काढावे लागतील. (अं. १ प्र. १)

३) फाटक्या लुगड्याचं निमित्त पुढं करून माझ्या दारूबाज अब्रूवर पांघरूण घातलंस (अं. ४ प्र. २)

४) दारूच्या धुंदीनं बहिरून निजलेला तुझा जीव माझ्या नाजूक बोलाफुलांनी कसा जागा होणार ? (अं. ४ प्र. २)

५) स्त्री जातीला नटविण्यासाठी समुद्राच्या उदरातून जितकी मोती बाहेर निघाली, त्यांच्या दसपट आसवांची मोती दारूमुळं स्त्रीजातीनं या 'एकाच प्याल्या'त टाकली आहेत. (अं. ४ प्र. ४)

६) कुबेराला भीक मागायला लावते, ती दारू ! (अं. ५ प्र. ४)

या सुधाकराच्या विरोधी प्रतिमानांप्रमाणे रामलालची काही वचने विरोधी कल्पनांतून व्यक्त होतात. उदा.,

देवब्राह्मणांच्या सत्यतेपेक्षाही अशा पुण्यरूप सतीच्या असत्यालाच परमेश्वराच्या आशीर्वादाचं अधिक बळ असतं. (अं. ५ प्र. ४)

बंडगार्डनवर सुधाकराला भेटणाऱ्या तिसऱ्या गृहस्थाच्या तोंडीही गडकऱ्यांनी अशी विरोधी प्रतिमाने दिली आहेत. तो गृहस्थ म्हणतो,

'काळोखातली दारूबाज दोस्ती अशी उजेडात उजळ माथ्यानं वावरू लागली, तर तुझ्याप्रमाणंच माझीही बेअब्रू भर चवाठ्यावर नाचायला लागेल.' (अं. ४ प्र. ३)

काही वेळा अशा विरोधात्मक कल्पना आशयसंपन्नतेपेक्षा केवळ चमत्कृतीच निर्माण करतात. उदा., तळिरामच्या आसन्नमरण अवस्थेत विरूपाक्षसारखे अत्यंत गौण पात्रही उद्गारते,

दिव्याची ज्योत जरी संथ असली, तरी तळिरामची धडपड सारखी चालू असेल, नाही ?' (अं. ५ प्र. २)

तळिरामाचा मृत्यू सर्व सदस्य आपल्या बोलण्याने हास्यास्पद करून टाकतात. तळिरामाच्या संदर्भात कोट्या करण्यामध्ये त्यांची एकमेकांत स्पर्धा सुरू होते. कोटिक्रम करण्यात कोणीच मागे पडत नाही; पण सर्वच पात्रांचे सारखेच कोटिक्रमयुक्त बोलणे नाट्यानुभवात भर घालीत नाही.

### आद्यानुप्रास व दोन-तीन शब्दांच्या अनुप्रासयुक्त जोड्या

गडकऱ्यांची भाषा प्राधान्याने आलंकारिक आहे. तिला अनुप्रासांची विलक्षण हौस आहे.

विशेषतः आद्यानुप्रासांचा वापर हे गडकऱ्यांच्या भाषेचे मुख्य वैशिष्ट्य आहे. आद्यानुप्रासाचे चांगले उदाहरण म्हणून सुधाकराचे पुढील भाषण सांगता येईल.

'मुलासकट माणुसकीला, सिंधूसकट संसाराला, सद्गुणांसकट सुखाला, जगासकट जगदीश्वराला सुधाकराचा हा निर्वाणीच्या निराशेतला प्रणाम !' (अं. ४ प्र. ३)

या उदाहरणातील प्रत्येक स्वतंत्र अनुप्रासात्मक शब्दबंधाला 'ला' हे अक्षर लागल्याने अंत्यअनुप्रासही साधला गेला आहे. दारूच्या दुष्परिणामाचे भयंकर चित्र साकारताना सुधाकराच्या तोंडून अनुप्रास येतात.

'निव्वळ हौसेनं जरी दारूशी खेळून पाहिलं, तरी दिवाळीचा दिवा भडकून होळीचा हलकल्लोळ भडकवल्यावाचून राहायचा नाही.' (अं. ४ प्र. ४)

दारूला उद्देशून असलेले सुधाकराचे भाषण असेच अनुप्रासात्मक आहे.

'तुझ्या जुलमी जादूनं जडावलेल्या जनावराला सुद्धा कळतं, की तू एक राक्षसी आहेस. (अं. ४ प्र. ४)

बंडगार्डनवरील पश्चात्तापदग्ध सुधाकर चौथ्या गृहस्थाला उद्देशून म्हणतो.

'उतावळेपणानं आपल्या उदार मनाचा उपमर्द केला, याची क्षमा करा.' (अं. ४ प्र. ३) किंवा

'जिथं कवडी किमतीच्या कंगालांनी माझी पैजारांनी पायमल्ली केली, तिथं सद्गुणी मनुष्याची सहानुभूती मला कशी मिळणार ?' (अं. ४ प्र. ३)

सुधाकराच्याच तोंडी अनुप्रासात्मक वाक्यरचना आहे, असे नाही. सिंधु, रामलाल यांच्याही तोंडी गडकऱ्यांनी अनुप्रास दिले आहेत. सिंधू म्हणते,

'तुमच्या चौदा चौकड्यांच्या राज्यात राहून रौरवाची राणी होण्यापेक्षा दुर्दैवाची दासी होऊन दुःखात दिवस कंठीन.' (अं. ३ प्र. ४)

सिंधूपेक्षा रामलालचे बोलणे अधिक अनुप्रासात्मक आहे.

'आर्यावर्ताच्या उदयोन्मुख भाग्याचा अचूक मार्ग सांगणारा मंत्रद्रष्टा महात्मा अजून अवतरावयाचा आहे.' (अं. ३ प्र. ३)

पद्माकर देखील अनुप्रासात्मक शब्दयोजना करताना दिसतो.

'या दीनदुबळया देहाची या दारूबाज दुष्टानंच प्राणांतिक दुर्दशा केली आहे.' (अं. ५ प्र. ४)





अनुक्रमणिका

आलंकारिक भाषेचा वापर करताना त्यांनी पात्रांच्या योग्यायोग्यतेचा फारसा विचार केला नाही. गडकऱ्यांनी विशेषण व विशेष्य व क्रियाविशेषण आणि क्रियापद यांमध्ये अनुप्रास साधले. सुधाकराच्या बाबतीत ही नादवती अनुप्रासात्मक भाषा परिणामकारक ठरून तिने नाट्याशयात भर घातली, पण बऱ्याच वेळा केवळ शब्दांच्या हव्यासामुळे ही अनुप्रासात्मक रचना कृत्रिम ठरली. आशयाशी ती एकजीव झाली नाही.

'मनाच्या मंडपीवर मूर्खपणाला मनमोकळेपणानं मिरास मिळते.' (अं. १ प्र. २)

हे तळिरामाचे विधान कृत्रिम रचनेचे उदाहरण म्हणून सांगता येईल.

मृत सिंधूला उद्देशून सुधाकर अखेरच्या क्षणी जे बोलतो, त्यातील अलंकरणच अधिक लक्षात येते.

'स्वर्गाचा संसार सजवून साजरा करण्याची तुझी योग्यता...' (अं. ५ प्र. ४)

हे सुधाकराचे वाक्य याची साक्ष देईल.

'एकच प्याल्यां'तील जवळ जवळ सर्वच पात्रे अनुप्रासात्मक बोलतात; पण त्यांचे बोलणे दरवेळी रसपरिपोषक ठरत नाही.

### यमकबद्ध वाक्यांतून साधलेली तालनिर्मिती

दोन समान लांबीच्या यमकबद्ध वाक्यातून साधलेली तालनिर्मिती हा या भाषेचा खास विशेष म्हणावा लागेल.

'ज्या तुझ्या बापाच्या घरी सदावर्त चालावी, त्या तुला घासभर अन्नाला अशी महाग केली, की गीतेसारख्या मुलीनं तुझ्यावर दया करावी आणि तुला सहस्रभोजनाचा रस्ता दाखवावा ! लहानपणी बाहुला-बाहुलीच्या लग्नात चिमुकला अंतरपाट धरण्यासाठी तू बेदरकारपणानं पैठणीच्या धांदोट्या केल्या असशील; त्या तुला आज फाटक्या कपड्यांमुळं बाहेर जाण्याची पंचाईत पडावी ! तुझ्या बापाच्या घरी खेळता खेळता ओंजळीच्या वैरणीनं तू जात्यात मोती भरडले असतेस, तरी कुणाला त्याचं काही वाटलं नसतं; त्या तुझी मी अशी दशा करून टाकली, की पोटासाठी आसवांची मोती वेरून तुला मोलाचं दळण करणं भाग पडावं !' (अं. ४ प्र. २)

प्रस्तुत उताऱ्यातील प्रत्येक वाक्यात दोन विरोधी प्रतिमांची विशिष्ट मांडणी करून गडकऱ्यांनी गद्य लयदार बनविले आहे. या गद्यातील ऊर्ध्वगामी फेक लक्षणीय आहे. गद्यशैलीचे एक आकर्षक रूप सुधाकराच्या या पश्चात्तापदग्ध भाषणात व्यक्त झाले आहे.

**पौराणिक संदर्भ**

'एकच प्याल्या'मधील पात्रांच्या संवादांतून काही पौराणिक संदर्भ व्यक्त झाले आहेत. हे पौराणिक संदर्भ नाट्याशय समृद्ध करतात. सुधाकराच्या तोंडी असलेल्या पौराणिक संदर्भांनी दारूच्या दुष्परिणामांचे एक परिणामकारक चित्र साकार होते.

१) परीक्षिताचा प्राण घेण्यासाठी मत्सराच्या त्वेषानं तक्षकानं बोरातल्या अळीचं रूप घेतलं, त्याप्रमाणं खवळलेले सप्तसमुद्र सूडाच्या बुद्धीनं या इवल्याशा टीचभर प्याल्यात सामावून बसले. (अं. ४ प्र. ४)

२) जगाच्या उद्धारासाठी अवतरलेल्या श्रीकृष्ण परमात्म्याचे हे पाहा छपन्न कोटी यादववीर दारूच्या एकच प्याल्यात बुडून अधःपात भोगीत आहेत. (अं. ४ प्र. ४)

सिंधूचे माहात्म्य प्रकट करण्यासाठी सुधाकर पौराणिक दाखला देतो.

'वामन अवतारी देवाला त्रिभुवनाचं माप घेण्यासाठी अवाढव्य त्रिविक्रम रूपानं तीन पावलं टाकावी लागली, पण या सुधाकराचं उभं त्रिभुवन या देवीच्या दोन पावलांपुरतंच होतं. (अं. ५ प्र. ४)

किंवा

'तक्षकाला मारण्यासाठी जनमेजयानं त्याला पाठीशी घालणाऱ्या इंद्रदेवतेलाही आगीत उडी टाकण्याला आमंत्रण केलं; त्याप्रमाणं या दारूच्या व्यसनाला घराबाहेर घालविण्यासाठी तुझ्यासारख्या साध्वींनीसुद्धा या व्यसनाला पोटात थारा देणाऱ्या पतिदेवाला लाथेनं घराबाहेर हाकललं, तरच आजच्या संभावित समाजातून हे दारूचं व्यसन हद्दपार होईल.' (अं. ४ प्र.२)

सिंधूच्या भाषणातही पौराणिक संदर्भ येतात. आपल्या बाळाला निमित्त करून सिंधू आपल्या दैवालाच उद्देशून पौराणिक दाखले देते.

'बाळ, अश्वत्थाम्याला त्याच्या आईनं पीठपाणी कालवून देऊन त्याची दुधाची तहान कशी तरी भागवली; पण, बाळ, आपली नशिबं अगदीच पांगळी आहेत. यातल्या चिमूटभर पिठावर सुद्धा आपली सत्ता नाही, ते लोकांचं आहे. त्या पिठापाण्याचा ओघळ तुझ्या तोंडावर पाहिला, तर, राजसा, तारामतीचा रोहिदास तुला हसून हिणवायचा नाही का ?' (अं. ४ प्र. ५)

पुराणकथांतील या उदाहरणांनी गडकरी नाट्याशय समृद्ध करतात.

तळिरामाचे स्वतःच्या मृत्यूबरोबरच सुधाकराचे व त्याच्या कुटुंबीयांचे जे अहित केले, त्यामुळे विरोधी चित्र म्हणून तिला घटोत्कचाचा संदर्भ आठवतो.

'घटोत्कचाला कर्णाची शक्ती लागली, तेव्हा त्यानं विचार केला, की मागं पडलो, तर





अनुक्रमणिका

पांडवांचीच माणसं चेंगरून मरतील. म्हणून तशात पुढं झेप घालून त्यानं एवढं मोठं कलेवर कौरव सेनेवर टाकलं !' (अं. ४ प्र. ५)

स्वार्थत्यागाच्या कल्पनेने झपाटलेल्या भगीरथाला मयूरध्वज राजाचे स्मरण होते.

'श्रीकृष्ण परमात्म्याच्या इच्छेसाठी मयूरध्वज राजानं आपलं अर्ध अंग करवतीनं कापून दिलं, त्याप्रमाणं माझ्या परमेश्वराच्या सुखासाठी माझ्या जिवापासून माझ्या भावी अर्धांगीला तोडणारी ही आकाशाची कुऱ्हाड...' (अं. ५ प्र. १)

पुराणकथांमध्ये एक सांस्कृतिक संचित असते. तसेच पुराणकथांचे आवाहन सार्वत्रिक स्वरूपाचे असते. ते प्रामुख्याने भावनिक स्वरूपाचे (सेंटिमेंटल अपील) आवाहन करते. पुराणकथांचा जनमानसावर मोठा प्रभाव असतो; तो लक्षात घेऊन गडकऱ्यांनी त्यांचे 'एकच प्याल्या'मध्ये कौशल्याने उपयोजन केले आहे.

**काही सुभाषिते**

'एकच प्याल्या'मध्ये सुभाषितवजा आलेली काही महत्त्वाची वाक्ये पुढीलप्रमाणे सांगता येतील :

१) संकल्प आणि सिद्धी यांच्यामध्ये परमेश्वराची इच्छा उभी असते. (अं. १ प्र. १)

२) प्रेमाला पात्र होणं हा मनुष्याचा धर्म असेल, तर दया हा देवाचा गुण आहे. (अं. ५ प्र. ३)

३) वाहतं पाणी किंवा अग्नी ही जात्या शुद्ध असतात. (अं. २ प्र. ३)

४) आगरकर आणि टिळक या महात्म्यांचा परस्परविरोध म्हणजे आकाशातल्या नक्षत्रांच्या शर्यती ! (अं. २ प्र. ३)

५) कृतज्ञता विचारशील नसते. (अं. ५ प्र. १)

६) रडणं हे संसारात संकटाशी लढण्याचं हत्यार नाही. (अं. ५ प्र. १)

७) लायकी-नालायकीचा प्रश्न फक्त जननी आणि जन्मभूमी यांच्या प्रेमाचा वारसा मिळवितानाच काय तो पुढे येत नाही. (अं. १ प्र. १)

८) सौंदर्य कोणत्याही स्थितीत आपली नाजूक शोभा सोडीत नाही. (अं. ४ प्र. १)

९) मुलीच्या दृष्टीला बाप पुरुषासारखा दिसत नाही, तर तो देवासारखा निर्विकार दिसतो. (अं. ४ प्र. १)

वरीलसारख्या सुभाषितांनी नाट्याशय समृद्ध झाला आहे.

### कोटिक्रम

कोटिक्रमयुक्त बोलणे हा गडकऱ्यांच्या नाटकातील पात्रांचा एक सर्वसामान्य विशेष आहे, असे म्हणावे लागेल. एकच प्याल्यामध्ये मुख्य पात्रांपेक्षा दुय्यम पात्रे अनेकदा कोटिक्रमयुक्त बोलतात. तळिराम व आर्य मदिरा मंडळाचे सदस्य जेवढ्या कोट्या करतात, तेवढ्या गडकऱ्यांच्या अन्य नाटकांत सापडणार नाहीत. तळिरामाच्या काही कोट्या पुढीलप्रमाणे सांगता येतील. -

औषधासाठी दारू प्यायला सुरुवात केली, तो दारूसाठी औषध पिण्यावर मजल येऊन ठेपली (अं. ४ प्र. ४)

तोंडाला तोंड दिलेस, तर तिथल्या तिथं एका तोंडाची दोन तोंडं करून देऊन दामदुपटीनं उसनं फेडीन (अं. १ प्र. २)

वैद्य, डॉक्टरही आपल्या जुगलबंदीत कोट्यांचा सुकाळ करतात.

डॉक्टर म्हणतो,

औषध घेण्यापूर्वीच्या आणि औषध घेतल्यानंतरच्या रोग्याच्या स्थितीत तीन दिवसांत जमीन अस्मानाचं अंतर

यावर वैद्य म्हणतो,

सत्य आहे, म्हणजे जो रोगी जमिनीवर असायचा, तो तीन दिवसांत अस्मानात जायचा. (अं. ४ प्र. ४)

'एकच प्याल्या'मधील गौण पात्रांच्या मानाने मुख्य पात्रांचे कोटिक्रमयुक्त बोलणे कमी आहे. सुधाकर रामलालला उद्देशून बोलताना गंभीर आशय असतानाही कोट्या करतो.

'विसर, ती गोष्टच विसर. माझं दारूचं व्यसन एक वेळ सुटेल, पण माझं व्यसन सोडविण्याचं वेड तुझ्या डोक्यातून मात्र जाण्याचं कठीण दिसतं.' (अं. ४ प्र. ४)

सुधाकराकडून मदिरामाहात्म्य ऐकलेला रामलाल म्हणतो,

'शब्दाचं शहाणपण शिकवायला म्हणून मी इथं आलो आणि शहाणपणाचे शब्द शिकून परत चाललो.' (अं. ४ प्र. ४)

भगीरथाची कोटीही याच पद्धतीची आहे, तो म्हणतो,

'तुझ्या माझ्या सुखावर ही संक्रान्त बसली, तरी तिळमात्राच्या प्राप्तीनंही गोड बोलून आपण आजचा सण साजरा केला पाहिजे.' (अं. ५ प्र. १)





अनुक्रमणिका

कोटिक्रमाच्या बाबतीत गडकऱ्यांनी आपल्या पात्रांचा सांस्कृतिक व बौद्धिक दर्जा लक्षात घेतला नाही.

### या भाषेचे व्याकरणदृष्ट्या अवलोकन

व्याकरणदृष्ट्या या भाषेची स्वरूपचिकित्सा केल्यास तिची अपूर्वता जाणवते. गडकऱ्यांसारखा शब्दप्रभु नवीन शब्द निर्माण करतो, नवीन शब्दबंध निर्माण करतो, जुन्या शब्दांना नवीन संदर्भ देतो. स्वतंत्र सामासिक शब्द तयार करतो, याचा प्रत्यय 'एकच प्याल्या'मध्ये येतो. अतर्क्यसामर्थ्यवान = अलौकिक शक्ती, बूज-ओज = पर्वा, गोठण = गोठा, धनंतर = धनाढ्य, पायमल्ली = अपमान, पुनर्लग्न = पुनर्विवाह, फैटण = घोड्याची गाडी, लबेदा = ओझे, जिम्मा = पुरवठा, गणना, रोजगार = दिनक्रम, अशा प्रकारे मूळ रूढ शब्दांना गडकरी किती तरी नवे पर्याय देतात, अर्थ देतात. काही शब्द एकत्र आणून गडकरी नवीन सामासिक शब्द तयार करतात. करुणशोभा, काजळकाठ, मदिराक्ष, जनसमुद्र, गावहोळी, धर्मसिंधू, शिव्याशेण, संक्रांतिकाल,

'एकच प्याल्या'मध्ये काही नवे वाक्प्रचार आढळतात. परिचित शब्द एकत्र आणून गडकऱ्यांनी 'एकच प्याल्या'त काही नवीन वाक्प्रचार तयार केले आहेत.

तीव्रतेने उत्तर देणे (क्रियाविशेषणाची जोड), व्यसनाशी सलगी करणे (दोन भिन्न गोष्टी एकत्र), कोवळ्या हृदयावर रसरशीत निखारे टाकणे (विशेषणांचे साहाय्य), हजार हिश्शांनी खोटे नसणे व हसून हेटाळणी करण्यास सुरुवात करणे (अनुप्रासात्मक रचना), एका हातावर तयार असणे (एका पायावर तयार असणे याच्याशी साम्य), जिभेला फाटा फुटणे (जीभ सुटणे किंवा वळवळणे याच्याशी साम्य) मरणापेक्षा अपेश खोटं, असं होऊन जाणे (बखर गद्यसदृश रचना) पूर्वजन्मी केले, ते कपाळी उमटणे (म्हणीप्रमाणे रचना), याबरोबरच पदर घालणे (मायेची पाखर घालणे), मन जडावणे (मन ओझ्याने दबून जाणे) आनंदाला आकाश ठेंगणे होणे, (आनंद गगनात मावेनासा होणे), इ. नवीन वाक्प्रचार गडकरी वापरताना दिसतात.

### स्थानांतरित विशेषणे

इंग्रजीतील स्थानांतरित विशेषण पद्धतीचा (ट्रान्सफर्ड एपिथेटस्) उपयोग गडकऱ्यांनी एकच प्याल्यामध्ये मोठ्या प्रमाणात केला आहे. अनेक अमूर्त गोष्टींना त्यांनी विशेषणे लावली आहेत. तरुण बुद्धिमत्ता, आत्मविश्वासाची उग्रता, किळसवाणी कटकट, कंगाल हसू, दुर्दैवाची दिशाभूल, भाग्यशाली जाणीव, कडू काळाचा कडवटपणा, घाणेरड्या व्यसनाने दुबळा झालेला पश्चात्ताप, कडू भीती, सुखाच्या तरुण इच्छा, अशा प्रकारच्या विशेषण-विशेष्याच्या जोड्यांतून गडकरी सौंदर्यपूर्ण, चमत्कृतिजनक अर्थनिर्मिती करताना दिसतात. या शब्दांच्या

जुळणीत काही वेळा नावीन्याचा हव्यास असतो. पण काही शब्दजोड्यांतून त्यांच्या तरल कल्पनाशक्तीचा आणि समर्पक योजकतेचा प्रत्यय येतो.

### अनुप्रासात्मक विशेषणे

अनुप्रासात्मक विशेषणे वापरून गडकरी काही नामपदबंध तयार करतात. बेवकूफ बाप, नालायक नवरा, मातीमोलाचा मनुष्य, दीडदमडीचा दारूबाज, दिवाणा दारूबाज, पुण्याईची ढाल, इ.

काव्यदृष्ट्या आणि व्याकरणदृष्ट्या 'एकच प्याल्या'तील भाषेचे विश्लेषण केल्यानंतर तीमधील शक्तिस्थाने जाणवू लागतात. भाषाभिव्यक्तीचे आणि शब्दबंधाचे अनेक नवे प्रयोग गडकऱ्यांनी केले आहेत, हे लक्षात येते. या नाटकात वैविध्यपूर्ण नाट्यभाषा आहे. या बहुरूपिणी भाषेने प्रयोजक (कार्यप्रवण) व शोभादायक अशी दोन्ही रूपे प्रभावीपणे मांडली आहेत. 'एकच प्याल्या'मध्ये जशी पांडित्यपूर्ण आणि वक्तृत्वपूर्ण भाषा दिसते, तशी अनलंकृत हृदयंगम भाषाही दिसते. एकच प्याल्यामधील भाषा केवळ अर्थप्रतिपादनासाठी येत नाही, तर ती आपल्या अंगच्या अनेक गुणांनी नाट्याशय विलक्षण समृद्ध करते. सुधाकरासारख्या प्रमुख व्यक्तिरेखेची भाषा वरवर वक्तृत्वपूर्ण, दिमाखदार, भरघोस विशेषणांनी ओथंबलेली अशी वाटली, तरी केवळ भाषिक रूपातून अत्यंत प्रत्ययकारी जीवनचित्रे उभे करण्याचे तिचे सामर्थ्य विलक्षण म्हणावे लागेल. 'या रिकाम्या प्याल्यात तुला काय दिसते ?' या प्रश्नावरील सुधाकराचे भाष्य त्यातील आशयाला समूर्त करणारे आहे. शब्दांना गडकरी कसे दृश्य रूप देतात, ते या भाषेतून समजते. प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव 'एकच प्याल्याला'यातील गडकऱ्यांची भाषा लक्षात घेतल्यास शोभादायक भाषेपेक्षा गडकऱ्यांच्या प्रयोजक भाषेचे प्रमाण उत्तरोत्तर वाढले आहे, हे जाणवते.

गडकऱ्यांच्या नाट्यसृष्टीमध्ये 'भाषा' हा एक वैभवशाली घटक आहे. 'अप्रकाशित गडकरी'वरून असे दिसते, की त्यांचा मराठी साहित्याबरोबर इंग्रजी आणि संस्कृत या भाषांतील साहित्याचा व्यासंग होता. हा व्यासंग त्यांच्या बहुरूपिणी भाषेला निश्चित सहायक ठरला असणार. पूर्वभाषेचे आणि आपल्या संस्कृतीचे अनेक विशेष आत्मसात करून गडकऱ्यांनी आपली भाषा सिद्ध केली. गडकरीय भाषेचे अपूर्व रसायन त्यांच्या साहित्यसाधनेतून निर्माण झाले आहे. गडकऱ्यांच्या भाषेने जसे अभिजनवादी वळण दाखविले, त्याप्रमाणे सौंदर्यवादी वृत्तीही प्रकट केल्या. या दोन्ही प्रवृत्तींचा सुंदर संगम त्यांच्या भाषेत घडलेला दिसतो. गडकऱ्यांच्या नाट्यभाषेमध्ये शोभादायक भाषेचे प्रमाण अधिक आहे, त्याचीही काही प्रमाणात मीमांसा करता येते. 'संयम' गडकऱ्यांच्या वाङ्मयीन प्रकृतीला मानवण्यासारखा नव्हता. भाषेच्या बाबतीतही याचा प्रत्यय येतो. काय काय सांगू ?





अनुक्रमणिका

कोणकोणत्या गोष्टी सांगू ? असे प्रश्न गडकऱ्यांच्या मनात निर्माण होत असावेत. त्यामुळे त्यांच्या भाषेला एक आवेगी प्रमत्त असे रूप येते. तिच्यातून उत्कट काव्य प्रकटते. अशा वेळी नाट्यप्रसंगांचा बंदिस्तपणा राहत नाही. आणि ही भाषा आपलेच अस्तित्व सारखे जाणवून देऊ लागते. अशा वेळी ती कार्यप्रवण होण्यापेक्षा शोभादायक होते. नादरम्यता, अनोखेपणा व नेमकेपणा ही डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी सांगितलेली गडकरीय भाषेची वैशिष्ट्ये 'एकच प्याल्या'मध्ये प्रत्ययास येतात. गडकऱ्यांच्या भाषेबद्दल प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी लिहिले आहे,

'गडकऱ्यांना भाषेच्या विविधांगी लावण्याचा दुर्मीळ साक्षात्कार झालेला होता. परंतु हे लावण्य न्याहाळण्याच्या भरात ते आत्मसात करून पुढे जाण्याची किमया पुष्कळदा त्यांच्याकडून घडत नसे. पण जेव्हा ती घडे, तेव्हा त्यांच्या शैलीला एक साधे, नितळ रूप आपोआप प्राप्त होई.'

प्रदर्शनप्रियता हा गडकऱ्यांच्या भाषाशैलीचा मोठा दोष असूनही प्रतिमा, प्रतीक, पुराणकथा, संकेत, सुभाषिते, इ. गोष्टींनी आणि भाषेच्या अंगभूत लयीने संपन्न असलेली ही नाट्यभाषा मराठी भाषेचे भूषण ठरली आहे.

**७ वी, साईकृपा हाउसिंग सोसायटी, मार्कंडी, चिपळूण.**

***





अनुक्रमणिका

# जीवन, भाषा, कला : एक गोची

कमल पाध्ये

...पण खरे निराळे अनुभव मी घेतले, ते आदिवासी मुलांचा 'नॉन-फॉर्मल एज्युकेशन'चा प्रकल्प करताना. हे कामाचं क्षेत्र मला अगदी नवीन होतं. हा प्रकल्प आम्ही इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन या संस्थेच्या आदिवासी-विभागाच्या मार्गदर्शनाखाली करत होतो. डॉ. चित्रा नाईक या संस्थेच्या डिरेक्टर. शिक्षणक्षेत्रातला त्यांचा अधिकार निर्विवाद.

प्रत्यक्ष कामाला सुरुवात करण्यापूर्वी अनौपचारिक शिक्षणपद्धतीची नीटशी कल्पना, माहिती आणि अनुभव तसा कुणालाच नव्हता. त्यासाठी आखलेल्या कार्यक्रमात चित्राताईंशी चर्चा करणं हा सर्वांत महत्त्वाचा भाग होता. अर्थातच प्रथम चर्चा, प्रकल्पाची अंमलबजावणी, त्यातून येणारे अनुभव, त्यांवर पुन्हा चर्चा आणि पुन्हा कार्यक्रमात बदल - अशीच प्रकल्पाची सुरुवात झाली. चित्राताईंशी अनेक प्रश्नांवर चर्चा करता करता मला या कामात अधिकच रस निर्माण झाला. प्रकल्पाच्या व्यवस्थापनाची प्रमुख जबाबदारी मी उचलली असली, तरी अहवाल तयार करण्यासाठी त्याची अंमलबजावणी, तीत येणाऱ्या अडचणी, निरनिराळ्या सूचना आणि चर्चा यांची माहिती असणं आवश्यक होतं. दरवर्षी सर्व कामांच्या फॉलोअप्‌साठी मूल्यमापन आणि त्याचे निष्कर्ष काढणंही आवश्यक होतं. अर्थातच या सर्व कामांच्या निमित्तानं सतत मासवण आणि आजूबाजूची केंद्रं यांचे दौरे करावेच लागत. अशा या दौऱ्यांतून आणि चर्चांतून अनुभवलेल्या काही गोष्टी आजही मला आठवतात.

ग्रामीण भागात समाजकार्य करायला निघालं, की तिथल्या माणसां-मुलांबद्दल आणि एकंदर प्रवृत्तींबद्दल काही आडाखे मनात बांधलेले असतात. हे आडाखे आदिवासींत काम करताना जसेच्या तसे धरून चालत नाही, आणि हे लक्षात आलं, जेव्हा मी पहिल्यांदाच मासवणला आणि आसपासच्या परिसरात कामाच्या निमित्तानं गेले, तेव्हा. माझ्या पहिल्या 'समाज-कार्यकर्ता' प्रकल्पाचं संपूर्ण काम संपलं, तेव्हा.

खरं म्हणजे, अनौपचारिक शिक्षणपद्धती म्हटलं, तरी अनौपचारिक आणि सहजशिक्षण-पद्धती यांच्या संमिश्र पद्धतीनंच पहिल्यानं ह्या प्रकल्पाची सुरुवात झाली होती. प्रचलित बालवाडी शिक्षणपद्धतीचाही वापर होत होता. अर्थातच कोसबाड इथं ट्रेन्ड झालेल्या शिक्षिका नेमण्यावर भर होता. शिकलेल्या आदिवासी मुली मिळणं जवळपास दुरापास्त होतं. अर्थातच त्या भागातल्या सधन, शिकलेल्या समाजाच्या मुलींना आम्ही नेमलं. या समाजाचे

आणि आदिवासी समाजाचे हितसंबंध पिळवणूक करणारे आणि पिळले जाणारे, असे परस्परविरोधी होते. शिक्षण देताना यातून काही प्रश्न निर्माण होतील, असं वाटलं नव्हतं.

एकदा एका शिक्षक-कार्यकर्त्यांच्या बैठकीत एका शिक्षिकेनं प्रश्न विचारला,

'आदिवासी मुलांना उपासमारीची सवय असते. रोज नास्त्याची गरज नसते. तुम्ही ती कशासाठी लावता ?'

अशा प्रकारचा प्रश्न कुणी विचारील, असं मला वाटलंच नव्हतं. पण परस्परविरोधी हितसंबंधांतून कुठल्याही प्रकारचे अमानुष प्रश्न आणि त्यांतून अमानुष वागणूक निर्माण होऊ शकते, हेच खरं.

मुलांच्या परिसरातील साहित्याच्या साधनांनी आणि साहाय्यानं हसतखेळत शिक्षण या मूलभूत पद्धतीच्या पायावर अनौपचारिक शिक्षणपद्धती उभारलेली. शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यांत खेळीमेळी, प्रेमभाव आणि सहभावना निर्माण झाल्याशिवाय ही पद्धत यशस्वी होणं अशक्य. शिक्षक आणि विद्यार्थी यांचे हितसंबंधच एकमेकाला मारक असले, तर हे कसं शक्य होणार ? आणि आमचं उद्दिष्ट कसं पुरं होणार ?

अनौपचारिक शिक्षणपद्धती राबवण्यासाठी ट्रेन्ड शिक्षिकांची गरज नाही, हे या वेळेपर्यंत आमच्या ध्यानात आलं होतं. मग या शिक्षणपद्धतीची शिबिरं घेऊन शिक्षिका तयार करणं महत्त्वाचं ठरलं. त्याची आखणी वगैरे चालू होती. पण हे सर्व होईपर्यंत आदिवासी शिक्षिका मिळवण्याची खटपटही चालू होती. त्या मिळत नव्हत्या.

या गोष्टींची चर्चा चालली असताना चित्राताईंनी एक प्रश्न विचारला :

'स्त्रिया मुलांना अधिक ममतेनं वागवतात का ? तुम्हांला काय वाटतं ?'

-आणि माझ्या मनात उभी राहिली, ती स्त्रीची मातृत्वाची प्रतिमा आणि तिच्याभोवती गुंफलेले तिचे गुणावगुण.

स्त्री म्हणजे ममतेची मूर्ती, ही कल्पना तिच्या मातृत्वशक्तीतून पोसली गेलेली. पण ही ममता प्रत्यक्षात केवळ तिच्या स्वतःच्या मुलांपुरतीच मर्यादित असते. स्वतःच्या मुलांच्या खाण्यापिण्याची काळजी करणाऱ्या, त्यासाठी वाटेल ते कष्ट उपसणाऱ्या स्त्रिया, 'आपला, तो बाब्या' या वृत्तीनं क्रूरतेच्या कुठल्याही टोकाला जाऊ शकतात, हा तर अनुभव आहे. हॉस्पिटलमधल्या लहान मुलांचं दूध आपल्या मुलालाच देणाऱ्या नव्हे, तर स्वतःही पिणाऱ्या स्त्रियांच्या कथा कमी नसतात. ममता, माया ही स्त्रियांना बहाल केलेली भूषणं ! 'आदिवासी मुलांना नास्ता कशाला ?' असं विचारताना किंवा 'दुसऱ्याच्या कार्ट्यां'ची आबाळ करताना ती विसरलेलीच असतात. आणि आजकाल तर सर्वच गोष्टींची किंमत पैशांनी मोजायची !

मी म्हटलं.

'स्त्री माता असते, सहनशील असते, या गोष्टी गृहीत धरून तीच केवळ बालमन जपू शकेल आणि त्यांचं मानसशास्त्र ओळखून त्यांना अधिक चांगल्या तऱ्हेनं शिक्षण देऊ शकेल, असं मला वाटत नाही. पुरुष सुद्धा हे कार्य चांगलं करू शकतील. शेवटी ज्याच्या त्याच्या प्रवृत्तीवर हे अवलंबून राहील.'

मग आम्ही एक शिकलेला तरुण आदिवासी मुलगा, प्रयोग म्हणून, एका केंद्रावर नेमला आणि त्याचा अनुभव चांगला आला.

लहान मुलांबद्दलचा असाच एक अनोखा अनुभव इथं आला. परिस्थितीनं दडपल्या गेलेल्या त्यांच्या भावनांचं एक बोलकं दर्शन त्यांनी घडवलं होतं.

बालवाडी केंद्रासाठी आणलेली खेळणी त्यांच्यासमोर टाकली. पण आई-बहिणींच्या ओच्या-पदरांआड लपलेली मुलं ! ती जागची हालली सुद्धा नाहीत.

'खेळणी घ्या. तुमच्यासाठीच आहेत. खेळा ना.' म्हटलं, पण डोळे लकाकत राहिले. एवढंच. खेळण्यांना हात लावायला ती धजली नाहीत.

स्पर्श हा मानवी मनाच्या भावनांचा प्रकट आविष्कार आणि बालमन तर कुठल्याही गोष्टीच्या स्पर्शातून आपली जिज्ञासा आणि संवेदना जोपासणारं. विस्तवाचा अनुभवही स्पर्शातून घ्यायला धडपडणारं. पण ही मुलं केवळ भयचकित नजरेनं खेळण्यांकडे नुसती पाहत होती. दारिद्र्यात वाढणाऱ्या त्या मुलांचा, ही खेळणी आपल्यासाठी आहेत, यावर विश्वासच बसत नव्हता. ती भांबावून गेली होती. परिस्थितीच्या दडपणामुळं खेळण्यांनाही हात लावायला ती विचकत होती.

माणूस म्हणजे, विचार करणारा प्राणी, ही एक माणसाची व्याख्या. पण विचार करणं आणि बोलणं याचा इथं अभावच होता. मुलं तर बोलत नव्हतीच, पण दहादा एखादा प्रश्न विचारला, तरी मोठी माणसंही तोंडातून 'ब्र' काढत नसत. 'हे असं का ?' असं मनात आलं आणि जाणवलं, की या माणसांचा शब्दकोशच गरजेपुरता आहे. शब्दभांडार वाढण्यासाठी आवश्यक अशा उफाळलेल्या भावना किंवा विचार व्यक्त करण्याची मानवी मनाच्या शक्तीची इथं जाण-जोपासनाच नाही. प्रश्न निर्माण करणारी जिज्ञासा, कुतूहल यांना इथं स्थानच नाही. गरजेपुरता शब्द वापरणारी ही माणसं. यांचं शब्दभांडार वाढणार कसं आणि मग ती बोलणार तरी काय ?

असे हे अनोखे आणि विदारक अनुभव. मन बेचैन करून टाकणारे.

पोटात अगदी कावळे कोकलायला लागले आणि आतडी चावायला लागले, की हा माणूस काही हालचाल करणार. तोपर्यंत उपाशी, सुस्त, आळशीपणानं दारूच्या नशेत डुबणार. आम्ही प्रकल्प सुरु केला, त्या वेळची ही परिस्थिती. आता त्याला दहा वर्षं उलटून गेली आहेत. मी काम करायचं सोडूनही सात-आठ वर्षं झाली आहेत. आज या समाजाची प्रवृत्ती आणि परिस्थिती सुधारलीही असेल. पण या माणसांचे प्रश्न, वेठबिगार, पिळवणूक वगैरेंबद्दल अजूनही वाचण्यात येतंच.

या मुलांच्या निर्भेळ आनंदाचे क्षण मी पाहिले, ते तरफाचा आवाज ऐकला, तेव्हा. आदिवासी नृत्यांत काय किंवा लोकगीतांत काय, एक प्रकारचा एकसुरीपणाच भरलेला असतो. त्यांच्या एकसुरी जीवनाचंच ते दर्शन वाटतं. पण या नृत्यात रात्ररात्र स्त्री-पुरुष रमून जातात. तोच त्यांचा आनंद अगदी भरभरून वाहणारा.

तरफाचा आवाज ऐकल्याबरोबर आणि ढोलकी वाजली, की सर्व मुलं भान विसरून डोलायला लागायची. आपण डोलतोय, हेही त्यांना कळायचं नाही. त्यावेळी ती खरजेनं लडबडलेली नसायची, पोट खपाटी गेलेली किंवा नगाऱ्यासारखं फुगलेली नसायची, की उघडीनागडी नसायची. ती असायची केवळ एक लय. निसर्गात भरून राहिलेली. निसर्गाशी आदिम नातं सांगणारी. त्या लयीशी माझ्या मनातल्या लयीचं नातं जमत असे आणि त्या मुलांच्या बेभान तंद्रीत मी रमून जात असे.

आजही कधीकधी ते डोलणं आठवतं. एकलेपणाचं एकसुरीपण तुटतं, एक लय फेर धरते आणि मन आनंदानं डोलू लागतं.

प्रकल्प १९८३ च्या डिसेंबरमध्ये संपला.

**मूळ संदर्भ** : कमल पाध्ये, **बंध-अनुबंध,** मुंबई : मौज, १९९३, पृ. २२६-९.

(आदिवासी मुलांबद्दलची ही निरीक्षणे काही अंशी समाजातल्या इतर श्रमजीवी वर्गातील मुलांनाही लागू पडत नाहीत का? या संदर्भात **भाषा आणि जीवन** दिवाळी १९९२ मधील 'थेंबे थेंबे वृत्तिविकास' लेख पहावा.)

***

# देवनागरीतील जोडाक्षरांची मोडतोड

सत्त्वशीला सामंत

जोडाक्षर हे देवनागरी लिपीचे एक उल्लेखनीय वैशिष्ट्य आहे. जोडाक्षर लिहिल्याने एक तर जागा वाचते, शिवाय लिपीचे वाचनही सुकर होते. दोन अक्षरे एका दृष्टिक्षेपात एकाक्षरासारखी वाचता येतात. पण अलीकडे 'महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळा'ने तयार केलेल्या पाठ्यपुस्तकांमध्ये जोडाक्षर - योजनेला जवळजवळ फाटा दिलेला आढळतो. काही वर्षांपूर्वी यंत्रांच्या सोयीसाठी जोडाक्षरे तोडून लिहिण्याचा निर्णय घेतला गेला असावा. पण आता संगणकीकरण झाल्यामुळे, जोडाक्षरे लिहिण्यासंबंधी यंत्रांची गैरसोय राहिलेली नाही, असे समजते. तथापि, जोडाक्षरे तोडून लिहिण्याची प्रथा पाठ्यपुस्तकांमध्ये तशीच चालू राहिलेली दिसते. मात्र ह्यातही फारशी सुसंगती राहिलेली दिसत नाही. पाठ्यपुस्तकांमध्येही जोडाक्षरे कधी रूढ पद्धतीने, तर कधी बिगररूढ नवीन पद्धतीने छापलेली दिसतात. त्यामुळे शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या मनात संभ्रम निर्माण होतो. तसेच, या नव्या पद्धतीचे तोटे फारसे कोणाच्या लक्षात आलेले दिसत नाहीत. मात्र अजून मराठीतील साहित्यग्रंथ व वृत्तपत्रे यांमध्ये जोडाक्षरे जुन्या पद्धतीनेच लिहिण्याची प्रथा चालू आहे, ही समाधानाची बाब होय. परंतु आजच्या शाळांमधून शिकणारा भावी वाचकवर्ग मात्र वेगळ्याच पद्धतीने शिकत आहे व त्याला रूढ जोडाक्षरांची ओळखच होत नाही. मग तो आपले साहित्य वाचणार कसे व लिहिणार तरी कसे ?

**पाठ्यपुस्तकांतील विसंगत उदाहरणे -**

१) ***सुलभ मराठी वाचनमाला*** - पुस्तक २ रे - इयत्ता ६ वी (१९७२)-

पृ. ३१ - व्याघ्रत्व, प्रोफेसर, कार्यक्रम (रूढ पद्धतीने)

प-. १४ - भ्रष्टाचार (बिगररूढ);

२) ***मराठी बालभारती*** - इयत्ता ७ वी (१९८६)

(प्रतिज्ञा) - समृद्धी -
पृ. ६९ - अद्भुत - → (बिगररूढ),

या पुस्तकांत इतर सर्व ठिकाणी रूढ जोडाक्षरेच वापरली आहेत.

३) ***मराठी वाचनपाठ*** - इयत्ता ८ वी (१९८२)-

शीर्षक पृष्ठ - द्‌वितीय
पृ. १ - बुद्‌धी
पृ. २३ - द्‌वेषमत्सर — (बिगररूढ)

पृ. ४२ - द्राक्षांचा (घोस)
पृ. ५६ - क्रिया — रूढ

४) ***संस्कृत प्रवेशिका*** - इयत्ता ८ वी (१९८२)-

**टीप** :- या पुस्तकातील मराठीचे लेखन शासनमान्य नियमांस अनुसरून आहे ... मात्र संस्कृतमधील जोडाक्षरांचे मुद्रण शक्यतो जुन्या वळणांप्रमाणे ठेवण्यात आले आहे.

प्रस्तावना (मराठी मजकूर) : द्‌वितीय, पद्‌धती (बिगररूढ),

प्रतिज्ञा (संस्कृत मजकूर) : समृद्धा (रूढ)

संस्कृत पाठ- - पृ. ३७ - सिद्‌ध (बिगररूढ)

पृ. ३४ - प्रसिद्ध (रूढ);

यांतून उद्भवलेले चुकीचे लेखन : - पृ. ३७ - समृद्‌ध

पृ. ६६ - बुद्‌ध;

५) ***विकास प्रकाशन - मराठी वाचनपाठ व्यवसाय*** - इयत्ता १० वी -

पृ. १० - बहुव्रीही, पृ. २० दारिद्र्य (रूढ)

पृ. १० - द्‌वंद्‌व, द्‌विगु, पृ. २० - हुद्‌दा (बिगररूढ)

६) ***बालमोहन विद्यामंदिर*** - इयत्ता १ ली - सहामाही परीक्षा - सामान्य ज्ञान, परिसर अभ्यास-प्रश्नपत्रिका-

पेमाने, चित्र, ध्रुवतारा, मित्राला, इंद्रधनुष्यातील, प्रत्येकी;

या पद्धतीमुळे पुढेपुढे जोडाक्षरयुक्त मोठे शब्द लिहिणे कठीण होऊन बसेल. देवनागरीमध्ये एका दंडावर तीन तीन अर्धे घटकवर्ण पेलण्याची ताकद आहे. त्या ताकदीचा उपयोग करून न घेतल्यास आगगाडीच्या डब्यांप्रमाणे लांबलचक शब्द लिहिण्याचा प्रसंग ओढवेल. उदा., इंग्रजीतील रोगांची, औषधांची नावे, शास्त्रीय संज्ञा, देशांची नावे, इ. (देवनागरीत जसेच्या तसे लिहावयाचे ठरल्यास). कित्येकदा संस्कृत वा मराठी शब्दांत दोन

वा तीन घटकवर्ण असलेली एकाहून अधिक जोडाक्षरे असू शकतात. उदा., कृत्स्न, मत्स्य, नित्यक्रम, श्लेष्मा, निष्कर्ष, प्रश्नचिह्न, क्लिष्ट, दारिद्र्य, वैशिष्ट्य, सत्त्वपरीक्षा, स्ट्रेप्टोमायसिन, मनःस्वास्थ्य,

नव्या पद्धतीत हे शब्द किती लांबलचक लिहावे लागतील व ते किती बेंगरूळ दिसेल, याची नुसती कल्पनाच केलेली बरी.

लिपीचे दृश्य स्वरूप हे उच्चारणाच्या दृष्टीनेही महत्त्वाचे आहे. शब्दांतील जोडाक्षरांचे घटक एकापुढे एक असे लिहिले, तर उच्चारणही - विशेषतः लहान मुलांचे उच्चारण बिघडणार- नव्हे, ते बिघडत चालले आहे. मोठेपणी तीच सवय कायम राहणार. दोन किंवा तीन घटकवर्ण मिळून जेव्हा जोडाक्षर बनते, तेव्हा ते घटकवर्ण एकमेकांना जोडून लिहिले, तरच वाचकाला त्यांचे एकात्म स्वरूप जाणवते व वाचक उच्चार बरोबर करतो. पण जेव्हा ते घटकवर्ण तोडून लिहिले जातात, तेव्हा ते तसेच तोडून वाचण्याकडे वाचकाची प्रवृत्ती होते.

म्हणून मराठी साहित्यातील विचारवंतांना माझे असे कळकळीचे आवाहन आहे, की त्यांनी या गोष्टींचा सांगोपांग विचार करून, यांचे दूरगामी दुष्परिणाम लक्षात घ्यावेत आणि 'पाठ्यपुस्तक निर्मिति व अभ्यासक्रम संशोधन मंडळा'ला हे धोरण सोडून देण्यास भाग पाडावे.

**एम्. ३/१, हीरामणि रतन सोसायटी, बांगुरनगर, म. गांधी मार्ग,**
**गोरेगाव (पश्चिम) , मुंबई ४०००९०.**
**दूरध्वनी : ८७३२४५१**

***





अनुक्रमणिका

# शब्द, कोश आणि प्रयोग

माधवी कोल्हटकर

कुठलीही नवी भाषा शिकताना एकदा व्याकरण लक्षात आलं आणि त्याप्रमामे वाक्यं करता यायला लागली, की शब्दसंपत्ती वाढवण्यासाठी शब्दकोशाचा चांगलाच उपयोग होतो, याबद्दल कुणाचं काही दुमत असण्याचं कारण नाही. पण अशी शब्दकोशातून शब्द वापरून संभाषण वाढवताना अनेकदा गमतीदार प्रसंगही निर्माण होतात.

मी जपानमध्ये काही काळ होते, तेव्हाची अशी एक मजेदार आठवण आहे. 'जपान टाइम्स' मधे आलेल्या बातम्या वाचायच्या. त्या संबंधातील शब्द इंग्लिश - जपानी शब्दकोशातून शोधून काढायचे आणि विभागातील इतर लोकांशी त्या संबंधात चुकतमाकत चर्चा करायची. भाषा वाढवण्यासाठी हा नित्याचा उपक्रम !

एक दिवस वर्तमानपत्रात बातमी होती :

तोक्योमधे पोल्यूशनवर (प्रदूषणावर) परिसंवाद.

त्या दिवशी विभागात गेल्यावर शब्दकोश काढून मी प्रदूषणाला शब्द पाहिला 'केगारे'. मग विभागातल्या एका विद्यार्थ्याशी त्यासंबंधी बोलायला सुरुवात केली. इतक्या सकाळी विभागात येणारा तो एकटाच जपानी विद्यार्थी होता.

मी केगारे हा शब्द उच्चारल्यावर त्याचा चेहरा मोठा चमत्कारिक झाला. मला नेमकं काय म्हणायचंय्, हे जाणून घेऊन त्यानं 'छेः ! छेः ! हे वेगळं ! हे वेगळं !' असं घाईघाईनं म्हणत प्रदूषणाला शब्द सांगितला. त्या दिवशी तो विषय तेवढ्यावरच राहिला. केगारे शब्द ऐकल्यावरची त्याची तारांबळ, गोंधळ एवढंच फक्त माझ्या लक्षात राहिलं.

त्यानंतर तीन-चार महिन्यांनी मी जपानमधील उत्तरेकडच्या बेटावर दहा दिवस एका घरी राहायला गेले होते. त्या ठिकाणी इकडच्या तिकडच्या गप्पा मारताना विषय निघाला आणि स्त्रिया, त्यांच्यासंबंधीच्या चालीरीती यांसंबंधी माहिती मिळाली. आपल्याकडे जशी बाळंतपणानंतर सव्वा महिन्याने तान्ह्या मुलाला घेऊन आई आधी जोगेश्वरीला किंवा तत्सम ग्रामदेवतेला जाते आणि मग बाहेर जायला-यायला सुरुवात करते, तसंच तिथंही बाळंतपणानंतर शंभर दिवसांनी बाळाला प्रथम जिजामधे म्हणजे शिंतो धर्माच्या उपासनामंदिरात नेऊन आणतात. त्याला ओ माइरी असं म्हणतात. पण तिथं आईनं

नेण्याऐवजी शक्यतो घरातल्या मोठ्या बाईंनी म्हणजे आजीनं वगैरे न्यायची प्रथा आहे. आईनं का जायचं नाही, असं विचारल्यावर कळलं,

'ती अजून म्हणजे, तशी पवित्र नसते ना देवळात जाण्यासारखी, म्हणून !'

-आणि अचानक माझ्या डोक्यात प्रकाश पडला.

म्हणजे आपल्यासारखंच तिथंही प्रदूषण दोन प्रकारचं - एक धार्मिक आणि एक लौकिक. परिसंवाद होता, तो त्यातल्या लौकिक प्रदूषणावर. औद्योगिकीकरणामुळं होणाऱ्या रासायनिक प्रदूषण, ध्वनि-प्रदूषण यांसारख्या विषयांवर, आणि मी उच्चारलेला शब्द होता, तो धार्मिक प्रदूषण म्हणजे विटाळ. मृत्यू, रक्त आणि घाण यांच्याशी संबंधित कामं करणाऱ्या व्यक्तींना असलेला आणि त्यांच्याशी संपर्क आला असता होणारा विटाळ !

हे लक्षात आल्यावर मला त्या मुलाचा चमत्कारिक चेहरा आणि गोंधळ आठवला. केगांरेवर तोक्योमध्ये परिषद म्हणजे त्याच्या डोळ्यांसमोर दृश्य आलं असणार- सत्तर ऐंशी वर्षांच्या ओबाडसान म्हणजे आज्या तिथं एकत्र येऊन 'काय या आजकालच्या मुली ! काही त्यांना सोवळंओवळं, विटाळचांडाळ कशाचं काही नाही. केव्हाही कशालाही शिवायचं. कुठंही जायचं. धर्म म्हणून राहिलेला नाही,' अशा गप्पा मारत जपानी चहाचे घुटके घेताहेत - अशा प्रकारचं !

पण आणखी एक प्रश्न राहतोच. मी जो इंग्लिश - जपानी शब्दकोश पाहिला, त्यात लौकिक प्रदूषणासाठी असलेला कोऽगाई हा शब्द का नसावा ? यासंबंधी माझ्या एका जपानी मैत्रिणीशी चर्चा केली, काही संदर्भ पाहिले, तेव्हा आणखी काही गोष्टी कळल्या.

जपानमध्येही प्रदूषणाचा प्रश्न निर्माण झाला, तो युद्धोत्तर औद्योगिकीकरणानंतर. विशेषतः १९६० पासून १९७०-७५ पर्यंतच्या काळात, तर तोक्यो हे जगातलं सर्वांत जास्त प्रदूषणग्रस्त शहर होतं. असं म्हणतात, की त्या काळी जर हवेत लोहचुंबक धरला, तर त्याला किती तरी लोखंडाचे कण चिकटून यायचे. यातली अतिशयोक्ती सोडून द्या, पण परिस्थिती खरोखरीच गंभीर होती. काळा पाऊस तर प्रसिद्धच आहे.

प्रदूषणाची यांहीपेक्षा दुर्दैवी घटना म्हणजे मिनामाता येथली, क्यूशू बेटावरील हे एक शहर, तिथं शिसो कंपनीचा ॲल्युमिनियमचा एक कारखाना होता. त्या कारख्यान्यातून नको असलेलं मेथिल मर्क्युरी हे प्राणघातक रसायन कित्येक काळपर्यंत समुद्रात सोडलं जात होतं. पण १९५९ मध्ये प्रदूषणाचा कळस झाला: पाण्याचीही सामावून घेण्याची शक्ती संपली आणि त्या पाण्यातले मासे खाऊन शेकडो प्राणी आणि माणसं आचके देऊन मरायला लागली. कित्येक जणांची वाचा गेली. कित्येकांना स्नायूंचे विकार जडले. त्या काळात

जन्मलेल्या कित्येक अर्भकांच्या मेंदूंत विकृती निर्माण झाल्या होत्या.

या प्रसंगानंतर प्रदूषणाविषयी जास्त गंभीरपणे विचार सुरू झाला. प्रदूषण रोखण्यासाठी प्रयत्न व्हायला लागले. आणि त्या वेळी या प्रदूषणासाठी शब्द रूढ करण्यात आला 'कोऽ गाई' आज या शब्दाचा कोशात दिलेला अर्थ 'पर्यावरणातील प्रदूषण' असा आहे खरा, पण कोऽ याचा मुळातला अर्थ - जनता आणि गाई म्हणजे इजा किंवा उपद्रव, अपाय. जनतेला उपद्रव किंवा अपाय असा शब्द प्रदूषणासाठी रूढ करणं ही गोष्ट जपानी समाजाची अतिशय प्रखर अशी सामाजिक सजगताच दाखवत नाही काय ?

**संस्कृत - कोश - विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे ४११ ००६.**

***

## भाषा : नोकरशाही आणि राजकारणी वळण

पंजाबातील हिंसाचार आणि हत्याकांड यांनी आजवर अनेक बळी घेतले. त्याबद्दल वृत्तपत्रांत येणाऱ्या बातम्या आपण प्रत्यही वाचतो. यात जिवाला मुकणाऱ्यांचे तीन प्रकारे वर्गीकरण केलेले आढळते :

१. अतिरेकी (दुर्जन),

२. पोलिस (सुजन),

३. सामान्य नागरिक (निरपराध).

नोकरशाहीच्या आणि राजकारण्यांच्या भाषेत, मृतांमध्ये अतिरेक्यांची संख्या अधिक असली, की परिस्थिती 'सुधारत असते.' बळींमध्ये निरपराधांचा आकडा वाढला, की परिस्थिती 'हाताबाहेर' जाते. आणि पोलिसांची हत्या होते, तेव्हा 'नीतिधैर्य खचण्याच्या मार्गावर' असते.

हत्याकांडातील एकूणच बळींच्या कुटुंबीयांच्या दुःखाचा विचार मनात येतो आणि... पण त्याची पर्वा कुणाला आहे ?

(दि टाइम्स ऑफ इंडिया, २३ ऑगस्ट, १९९२ दिनेशकुमार यांच्या 'द विडोज् ऑफ पंजाब' या लेखावरून.)

**प्रेषक : विजया देव**

# जेरी, पेरी

मन्दाकिनी मराठे

'अक्षरनंदन' शाळेच्या बालवाडीत 'फळं' हा विषय चालू होता. तेव्हा माझ्या बागेत चेरीसारख्या दिसणाऱ्या फळांनी झाड डवरलं होतं. ते पाहिल्यावर शाळेतल्या मुलांना दाखवायला ती फळं न्यावीत, असं मी ठरवलं. शाळेत पोचल्यावर मी नेलेल्या फळांच्या डहाळ्या एका ग्लासमध्ये पाणी घालून मुलांना दिसतील, अशा ठेवल्या. त्या डहाळ्यांना एक-दोन हिरवी, एक-दोन लाल आणि लाल होऊ लागलेलं पण अजून देठाजवळ हिरवं असलेलं अशी काही फळं लटकली होती. बोराएवढ्या आकाराची ती फळं पाहून, 'ह्या ताई हे काय घेऊन आल्यात, बरं ?' असं प्रश्नचिन्ह मुलांच्या चेहऱ्यांवर प्रथम उमटलं आणि नंतर 'ताई, हे काय आहे ?' असा गिल्ला झाला.

'पाहा ना तुम्ही, काय आहे, ते.'

'टोमॅटो.'

'सफरचंद'

'चेरी, चेरी...'

'अंहं !'

'सांगा ना, त्याला काय म्हणायचं ?'

'मला कुठं माहित्येय् !'

त्या झाडाचं शास्त्रीय नाव 'मालपिघिया ग्लाब्रा' आणि प्रचलित नाव 'बारबाडोस चेरी' असं आहे; पण मला ते मुलांना सांगायचं नव्हतं.

'काय असेल बरं याचं नाव ?'

'आम्हांला नै ना म्हैत.'

'आपल्याला कुणालाच माहीत नाही, तर आपणच त्याला एक नाव देऊ. अगोदर पाहा तरी ही फळं तुम्ही. रंग कसला आहे त्यांचा ?'

'ह्याचा लाल'.

‘ह्याचा हिरवा.’

‘त्याचा थोडा हिरवा, थोडा गुलाबी.’

‘ताई, ह्याचा नुसता लाल लाल.’

मी म्हटलं,

‘होय की, त्याचा रंग अगदी लाललाल चुटुक आहे.’

पूर्ण पिकलेल्या त्या फळाचा रंग खरंच अगदी लाललाल चुटुक होता.

‘लालभडक’ एक आवाज आला.

(भडक आणि चुटुक यांच्यांतल्या अर्थच्छटेतील फरक उलगडण्याच्या भरीला काही मी पडले नाही. पण फळांचा रंग आणि लालचुटुक हे त्याचं वर्णन किंवा चुटुक शब्दाचं नावीन्य कुणाकुणाला भावून गेलं असावं, याचा गमतीशीर प्रत्यय मला नंतर आला. चार-पाच दिवसांनी मी शाळेत गेले असताना एका मुलीनं विचारलं,

‘ताई, तुम्हीच आणली होती, की नाही, ती फळं, लाललाल चुटुक्क ?’

‘ह्या फळासारख्या लाल रंगाचं इथं काय काय आहे, सांगा, बघू !’

मुलांच्या नजरा इकडे तिकडे लाल रंग शोधू लागल्या. कुणाच्या स्कर्टचा, कुणाच्या पँटचा, तर कुणाच्या शर्टावरच्या नक्षीतला लाल रंग मुलांनी दाखवला.

एका छोटीनं बोटं मिटलेले तिचे दोन्ही पंजे माझ्यासमोर धरले. तिच्या नखांना लावलेलं नेलपॉलिश बरोबर फळांच्याच रंगाचं होतं.

आता हे फळ आपण खाऊन बघायचं ?

‘हं.’

‘ताई, मला नको’

चेहऱ्यावर नापसंती, साशंकता नव्यानं काही खाऊन पाहायची तयारी नसावी.

दुसरा आवाज,

‘ताई, मी नाही खाणार, मला नकोय्.’

माझा नाही खायचा मूड, असा भाव.

‘बरं, तू नको खाऊ. ज्यांना हवं, त्यांनी खाऊन बघा. आणि कसं लागतंय्, ते मला सांगा.’

मी प्रत्येकाला चव घेण्यापुरता लहानसा तुकडा दिला. काहींनी पुन्हा मागून घेतला.





अनुक्रमणिका

ज्यांनी आम्हांला नाही खायचा, असं आधी म्हटलं होतं, त्यांनी आता मागून घेतला.

ते एक बोरायेवढं फळ बारा-पंधरा मुलांना चव घ्यायला पुरलं. प्रत्येकानं थोडं थोडं घेतल्यामुळं एक छोटंसं फळ सर्वांना चाखता आलं, हे आलं असेल का मुलांच्या लक्षात ? या मुद्द्याकडे मुलांचं लक्ष वेधता आलं असतं, तर बरं झालं असतं, असं नंतर मला वाटून गेलं.

कसं लागलं ?

'ताई, आंबट लागतंय्.'

'आंबऽट.'

कोणीतरी म्हणालं,

'तुरट.'

त्या फळाची चव आंबट असली, तरी त्यात एक प्रकारचा तुरटपणा होता खराच.

'आणखी आंबट काय काय असतं बरं ?'

लिंबू, कैरी, चिंच अशी उत्तरं आली.

'आंबा.'

हे उत्तर मी मान्य करीन, की नाही, असं वाटून मी त्यावर काही म्हणायच्या आत कल्पकनं सांगून टाकलं,

'आंबा सुद्धा कधी कधी आंबट असतो.'

'होय, बरोबर आहे तुझं. आता आंबट फळांचं काय काय करतात, ते सांगायचं.'

सरबत, पन्हं, लोणचं अशी उत्तरं मिळाली.

'ताई, तुमच्या हातात काय आहे ?'

गर देऊन माझ्या हातात त्या फळाचं बी उरलं होतं.

'बघू.' काही जणांनी जवळ येऊन ते पाहून घेतलं. या फळाची बी बऱ्याच फळांची असते, तशी गुळगुळीत, चकचकीत नव्हती. बरीच खडबडीत होती. बी दुरूनच न्याहळत रमा उत्तरली.

'बी आहे ती.'

'बरोबर. ही बी नसती, तर बरं झालं असतं, नाही ? आपल्याला सगळंच फळ खाता

आलं असतं.'

'सिताफळात तर कित्ती बिया असतात.'

'होय ना, खाताना बियांची कटकट !' असं मी म्हटल्यावर कुणी तरी कटकट शब्द म्हणून पाहिला.

'बियाच नसत्या, तर ?'

'ताई, मग झाडच नसतं आलं.'

मुलांनी लहान लाहन कुंड्यांत नुकत्याच कसल्या कसल्या बिया पेरल्या होत्या. झाडं उगवून, त्यांना फळं लागण्याची ती वाटही पाहायला लागली होती.

'ह्या फळाला नाव द्यायचं राह्यलंच की. सगळ्यांनी हाताची घडी करून शांत बसायचं आणि या फळाला नाव काय द्यावं, याचा विचार करावा.'

क्षणभर शांतता भासली. चेरी, टोमॅटो, सफरचंद ही सुरुवातीची नावं पुन्हा आली. शिवाय आता फळाची चव घेऊन पाहिल्यानंतर, की काय, त्यात पेरू आणि जांभूळ यांची भर पडली होती. कच्च्या पेरूतला तुरटपणा आणि अर्ध्या पिकल्या जांभळाची आंबटसर चव, आमसुली तांबूस रंग अशी काही साम्यं त्यांनी हेरली असावी.

'ही नावं नकोत. आपण नवीनच शोधू या.'

'जां-भ-ळ ठेवायचं, ताई ?'

'म्हणजे जांभूळ न म्हणता जां-भ-ळ म्हणायचं ? भूच्या ऐवजी भ म्हणायचा, असंच ना ?' उकार वगळून नवीन नाव तयार करायची प्रक्रिया चालू झाली होती.

'ह्यापेक्षा निराळं नाव सांगा.'

सुनृताच्या मनातून जांभूळ जात नसावं. फळाचा आकारही जांभळाच्या आसपासचाच होता. ती एकदम उद्गारली,

'जेरी, ताई जेरी.'

नवीन नाव सापडल्याचा आनंद, विस्मय तिच्या डोळ्यांत चमकून गेला. आर्किमिडीजच्या युरेकाच्या जातीचा होता का तो आनंद आणि विस्मय ?

कल्पक तिच्या शेजारीच बसला होता. सुनृताहून मोठ्या आवाजात तो ओरडला,

'पेरी, पेरी !'





अनुक्रमणिका

पेरूच्या चर्वीच्या साम्याबद्दल तो ठाम असावा.

'उद्या तुम्ही ह्या फळाचं चित्र काढायचं हं !' मी म्हणत होते; पण माझा आवाज जेरी, पेरीच्या कल्लोळात बुडून गेला होता.

समर्पक नाव शोधून काढण्याची ही प्रक्रिया कशी होत असावी ? लायन आणि टायगर यांच्यापासून निर्माण झालेल्या प्राण्याला शास्त्रज्ञांनी लायगर म्हटलं. पोटॅटो + टोमॅटो यांच्या मिलाफाला पोमॅटो म्हटलं. नवीन नाव या पद्धतीनं तयार होतं, हे या मुलांच्या कानांवर असेल ? तशी शक्यता वाटत नाही. मुलांचं काम, तसं पाहिलं, तर थोडं जास्तीचंच होतं. नावात ज्या घटकांचं एकत्रीकरण करायचं, तेही त्यांनीच शोधून काढलं होतं. आपल्या आपण साम्य शोधून त्यांनी नवीन नाव तयार केलं जेरी ! पेरी !

**२४ लक्ष्मी सहकारी वसाहत, सेनापती बापट मार्ग, पुणे ४११०१६.**

***

## एटिकेट

विजया देव

शब्दांना अर्थ कसे प्राप्त होतात व शब्दांभोवतीचं अर्थाचं वलय कालांतरानं कसं बदलत जातं, याचा अभ्यास मनोरंजक ठरतो. अर्थाविषयीचं हे कुतूहल भाषा-अभ्यासकांनाच असतं, असं नव्हे. भाषेचा वारसा ज्यांना ज्यांना मिळालेला आहे, त्या सर्वांनाच, म्हणजे समस्त भाषकांना या खोल पाण्यात उतरणं आवडतं. इतकं, की वृत्तपत्र, नियतकालिकं यांच्या आवृत्त्यांमध्येही एखादं छोटं सदर या विषयाला वाहिलेलं असतं.

१०४ वर्षांपूर्वीच्या 'टाइम्स ऑफ इंडिया'तील ही शब्दकहाणीच बघा ना ! (दि टाइम्स ऑफ इंडिया, गुरुवार, ऑक्टोबर ११, १९८८)

'एटिकेट' या शब्दाला सुरुवातीला असलेला अर्थ आणि त्याचा झालेला अर्थविस्तार व त्या मागचं कारण यावर हे स्फुट आहे.

'एटिकेट' या शब्दाला सुरुवातीला अर्थ होता : चिठ्ठी, लेबल, खुणेची चकती-एवढाच.

चौदाव्या लुईच्या कारकीर्दीत व्हर्सायच्या राजवाड्यातील एका वृद्ध स्कॉच माळ्याने भोवतालचा परिसर अत्यंत सुशोभित केला होता. आपण फुलवलेल्या, आकर्षक रचना केलेल्या बागेची कदर न करता दरबारातील लोक वाटेल तशी ये-जा करतात, बाग तुडवतात, यानं त्याचा संताप झाला. बेशिस्त वावरणाऱ्यावर उपाय म्हणून त्यानं जायच्या-यायच्या वाटा दर्शविणाऱ्या खुणेच्या चिठ्ठ्या दुतर्फा लावल्या. लोकांनी त्यांमधूनच ये-जा करावी, म्हणून.





अनुक्रमणिका

सुरुवातीला लोक तिकडेही दुर्लक्ष करत. पण नंतर 'दरबारातील लोकांनी 'एटिकेट'मधूनच आलं-गेलं पाहिजे, अशी श्रेष्ठींकडून सूचना आली. त्याचं काटेकोर पालन व्हायला लागलं.

कालांतराने 'टु कीप विदिन द एटिकेट्स्'चा विशिष्टार्थ जाऊन 'अनेक अलिखित नियमांचं, संकेतांचं, दरबारी वागणुकीचं उचित पालन' असा विस्तार झाला.

आपल्या वाचकांना 'कुशल', 'प्रवीण' अशा शब्दांनी इथं आठवण होणं स्वाभाविक आहे. 'कुश' जातीचं गवत आणण्यात वाकबगार अशा अर्थी असलेला 'कुशल' हा शब्द आपण कोणत्याही गोष्टीत वाकबगार या अर्थी वापरतो. वीणा वाजवण्यात पारंगत, तो प्रवीण. हेही विशेषण आपण कोणत्याही गोष्टीत पारंगत असलेल्या व्यक्तीसाठी वापरतो.

**६१/१४, सुप्रिया, एरंडवन, पुणे - ४.**

***





अनुक्रमणिका

# ख्रिस्ती धर्मविषयक सामान्य शब्दावली

अशोक रा. केळकर

ख्रिस्ती धर्म आणि इंग्लिश भाषा यांचा काही खास संबंध आहे, अशातला भाग नाही (जसा इस्लाम आणि अरबी भाषा यांचा आहे). तर मग मराठीत बोलताना किंवा लिहिताना ख्रिश्चन, फादर, मिशनरी हे इंग्लिश शब्द (किंवा पाद्री, सांतु हे पोर्तुगीज शब्द सुद्धा) कशासाठी वापरायचे ? ती एकेकाळच्या राज्यकर्त्यांची भाषा होती, म्हणून ?

यासाठी म्हणून ही इंग्लिश-मराठी वर्णानुक्रमे परिभाषासूची तयार केली आहे. धर्मपंथांची विशेषनामे (उदा., मेथडिस्ट) यात दिलेली नाहीत; पण विशिष्ट धर्मपंथातच उपयोगी पडावे, असे काही शब्द यात दिलेले आहेत. पर्यायी इंग्लिश शब्द (उदा., Bible सोबतचा Holy Scripture) किंवा पोटनोंदी म्हणून दिलेले इंग्लिश शब्द (उदा., Bible खालचा gospel शब्द, Church खालचा chapel शब्द) स्वतंत्रपणे नोंदलेले नाहीत. मराठीत अतिरूढ झालेले परकी शब्द (उदा., बायबल, चर्च, पोप) पर्यायी प्रतिशब्द म्हणून स्वीकारले आहेत. तु. म्हणजे तुळा, तुलना करा. इंग्लिश शब्दांचे योग्य उच्चार जरूर वाटली, तिथे दिले आहेत. (उदा., abbey).

abbey (ॲबि) संघ-स्थानक, मठ (तु. religious order)

- abbess, mother superior मठप्रमुखा, महंतीण (तु. Mother2)
- abbot, brother superior मठप्रमुख, महंत
- monastery पुरुष-मठ
- monk मठवासी संन्यासी, मठवासी
- nun मठवासी संन्यासिनी, मठवासिनी
- nunnery, convent स्त्री-मठ
- wandering monk, friar परिव्राजक, यायावर संन्यासी

altar (ऑल्टर) वेदी

apostle प्रेषित, आद्य धर्मप्रसारक, आद्य धर्मोपदेशक





अनुक्रमणिका

archbishop मुख्य अवेक्षक धर्मगुरू, आर्चबिशप (तु. parish खाली archdiocese)

archdeacon) मुख्य धर्मगुरुसहायक, महाधर्मगुरुसहायक, आर्चडीकन

atheist निरीश्वरवादी (तु. non-christian, theology)

Bible, Holy Bible, Holy Book, Holy writ, Holy Scripture

पवित्र शास्त्र, पवित्र संहिता, बायबल

the Acts of the Apostles प्रेषित-कार्यावली

book : chapter : verse पुस्तक : अध्याय : ओवी

the Chronicles इतिवृत्तावली

epistle आवाहन-पत्र

Genesis सृष्टि-उत्पत्ती (तु. to create खाली creation)

gospel शुभवर्तमान

Lamentations विलाप

New Testament नवा करार, नवसंविदा

non-canonical book, apocryphal book पीठ -अस्वीकृत पुस्तक

old Testament जुना करार, पुराणसंविदा

Pentateuch (पेंटाट्चूक) पुस्तकपंचक

Bishop अवेक्षक धर्मगुरू, महाधर्मगुरू, बिशप (तु. Parish, Church 1)

Bishop of Rome, Holy Father, Pope, Vicar of Christ रोमचे महाधर्मगुरू, परमाचार्य, पोप

body देह (तु. Soul)

Brother (addressing, mentioning, entitling lay priest, novice,

Lay preacher, Lay proselytizer) बंधु-श्री

Cardinal धर्मनिर्वाचक; कार्डिनल

Chaplain, padre (priest of ship, regiment, chapel,

institution, aristocratic family) प्रार्थनागुरू (तु. priest)

Christ, Messiah, Lord Christ मसीह-हा, अभिषिक्त, ख्रिस्त, ख्रिस्तप्रभु, प्रभु
(तु. Holy Trinity)

Christendom (क्रिसनड्म) ख्रिस्तीधर्मीय मानवसमाज

Christian ख्रिस्तीधर्मीय, ख्रिस्ती, ख्रिस्तानुगामी

Christianity ख्रिस्तीधर्म, ख्रिस्ती धर्मसंप्रदाय, ख्रिस्तानुगमन

Church १ देवालय, देऊळ, चर्च

Catehdral पीठ-देवालय, कॅथीड्रल (तु. Bishop)

Chapel प्रार्थनामंदिर, प्रार्थनाकक्ष (तु. Chaplain)

२ धर्मपीठ, चर्च (तु. religious denomination)

canon-law धर्म-कायदा-संहिता, धर्म-नीति-संहिता

Canonical, orthodox पीठ-स्वीकृत, सत्यदृष्टिमूलक

Catechism सिद्धांत-पाठ

flock पाल्यसमाज, कळप (तु. Pastor)

heresy मिथ्या-दृष्टी, पाषंड

liturgy उपासना-संहिता, धर्म-विधि-संहिता

non-canonical पीठ-अस्वीकृत

orthodoxy सत्यदृष्टी

religious congregation उपासकसमाज

religious doctrine धर्म-सिद्धांत, धर्मदृष्टी, सिद्धांत-संहिता
(तु. cheology)

cleric, ordained priest, regular priest, presbyter 2 पुरोहित,
सुदीक्षित धर्मगुरू (तु. Priest)

communion 1 Eucharist (यूकरिस्ट), communing through
Lord's supper प्रभुभोजनविधि

mass समारंभपूर्वक प्रभुभोजनविधि

२ communing with God देवसंमिलन

३ communing in Christ प्रभुसंमेलन, ख्रिस्तभागिता

confirmation धर्मदीक्षापुष्टी, दृढीकरण (तु. to baptize)

deacon, dean धर्मगुरुसहायक, डीकन, डीन

ecumenism सर्वपंथसहकार (तु. Secularism 2, sectarianism)

ecclesiastical धर्मपीठीय (तु. church 2)

ecclesiastical hierarchy, holy orders धर्मपीठीय श्रेणिसोपान (तीन मुख्य श्रेणी : bishop, priest, deacon तु. cleric)

episcopalian, conformist धर्मदीक्षावादी

presbyterian जॉन कॅल्व्हिनप्रणीत सिद्धांत-संहिता मानणारा धर्मदीक्षावादी

established church प्रस्थापित धर्मपीठ

faith श्रद्धा

Father 1 पहा Holy Trinity

2 (addressing, mentioning, entitling priest) पिता-श्री (तु. Bishop of Rome)

God, the Lord ईश्वर, दैव (तु. Christ, Holy Trinity)

grace कृपाप्रसाद, प्रसाद, अनुग्रह (तु. to confer grace on, to seek grace from)

heathen (हीधन), pagan (पेगन), (not accepting Biblical God, neither Jewish nor Christian nor Muslim) पवित्र शास्त्रप्रणीत ईश्वर न मानणारा (तु. non-Christian)

His Beatitude (title of Patriarch)परमपुनीत

His Eminence (title of Cardinal) परमश्रेष्ठ

His Grace (title of Archbishop, Bishop) परमानुगृहीत

His Holiness (title of Bishop of Rome) परमपुनीत

holy, sacred, hallowed, blessed पवित्र, पुनीत (तु. to conscrate, profane 1 & 2, secular 1)

heavenly, celestial स्वर्गीय

Worldly, earthly, mundane ऐहिक

holy mystery पवित्र रहस्य, पवित्र चमत्कार (तु. miracle)

Holy Trinity पवित्र त्रियुती, त्रि-ऐक्य (तु.unitarian)

Father परमपिता (तु. God)

Son प्रभुपुत्र (तु. Christ, Son of Man)

Holy Ghost, Holy Spirit पवित्र आत्मा (तु. Soul)

lay सुदीक्षितेतर, सामान्य, प्रापंचिक (तु. to ordain, novice, Brother)

matrimony, holy matrimony, wedding विवाहविधी

miracle चमत्कार (तु. holy mystery)

Mother 1 Holy Mother, Holy Virgin पवित्र माता, पवित्र कुमारी

2 (addressing, mentioning, entitling abbess) माता-श्री (तु. abbey खाली abbess)

non-Christian बिगर-ख्रिस्ती, ख्रिस्ती धर्मीयेतर (तु. atheist, heathen)

non-conformist, non-episcopalian धर्मदीक्षा-अस्वीकारवादी

novice (नॉव्हिस) नव-उपदेशित, उमेदवार सदस्य (तु. Brother, to ordain, lay, vow 3)

parish शाखापीठ, धर्मपालक-क्षेत्र (नु. Pastor)

archdiocese मुख्य अवेक्षापीठ (तु. archbishop)

diocese अवेक्षापीठ, महाशाखापीठ (तु. bishop)

pastor धर्मपालक, शाखाधर्मगुरू, मेंढपाळ (तु. Church-२ खाली flock)





अनुक्रमणिका

vicar (व्हिकर) उपधर्मपालक

Patriarch धर्मपितामह, पॅट्रिआर्क

piety, devotion, devoutness धर्मपरायणता, धार्मिक वृत्ती (तु. communion 2)

preacher धर्मोपदेशक, प्रवचनकार (तु. priest)

presbyter 1 elder (elder elected from congregation for priestly duties) धर्मवृद्ध

२ पहा cleric (तु. episocaplian खाली presbyterian)

priest, minister, padre धर्मगुरू (तु. cleric, preacher, chaplain, to

proselytize खाली proselytizer)

lay priest, secular priest अ-सुदीक्षित धर्मगुरू (तु. to ordain)

profane 1 अपवित्र (तु. holy, secular 1) २ पहा secular २)

prophet (maker of divinely inspired revelations) देवस्फूर्त प्रकाशक (तु. apostle)

religion १ धर्मसंस्था २ धर्मसंप्रदाय (तु. religious denomination)

religious conversion 1 (from one religious denomination

to another) धर्मांतरण, धर्मपरिवर्तन, धर्मपंथांतरण

२ (from ordinary layman to man of piety) धर्मपुष्टीकरण

religious denomination (with a specific doctrine &

liturgy) (तु. rligion २)

religious order धर्मसंघ (तु. abbey, vow ३, Society of Jesus)

the rule धर्मसंघविनय, धर्मसंघ-नियमसंहिता

religious rite, holy rite धर्मविधी (तु. to officiate, sacrament,

sin खाली absolution, communion1)

funeral rite दफनविधी, अंत्यविधी

reverend (title of priest, especially cleri पूज्य (लg. to venerate, venerable)

very reverend (title of deacon, dean) अतिपूज्य

right reverend (title of Anglican Bishop) परमपूज्य

most reverend (title of cathotic Bishop, archbishop)परमपूज्य

Sacrament धर्मसंस्कारविधी, धर्मसंस्कार (तु. religious rite, to baptize, communion 1, matrimony, to ordain, confirmation, sin)

saint पहा to canonize

salvation of the soul, saving of the soul आत्म्याचे तारण

Sectarianism पंथाभिनिवेश (तु. ecumenism)

secular १ profane २ पवित्रेतर (तु. holy, profane १)

२ धर्मनिरपेक्ष (तु. religion, १ religion २)

३ पहा priest खाली secular priest

secularism १ धर्मनिरपेक्षतावाद (तु. secular २) २ सर्वधर्मस्नेहभाव (तु. ecumenism, sectarianism)

seminary धर्मगुरू-विद्यालय

sin पापकर्म (तु. works)

absolution पापविमोचनविधी

extreme unction अंत्य अभ्यंग

penance पापक्षालनविधी, प्रायश्चित्त विधी

Sister (addressing, mentloning, entitling nun) भगिनी-श्री (लg. abbey खाली nun)

Society of Jesus येशूसंघ (तु.religious order)

Jesuit येशूसंघीय

Son of Man मनुष्यपुत्र (तु. Holy Trinity खाली Son)

soul, spirit आत्मा, प्राण (तु. body, Holy Trinity खाली Holy Ghost)

spiritual आत्मिक, आध्यात्मिक

theology धर्ममीमांसा, धर्मचर्चा, अध्यात्मशास्त्र, ईशज्ञान (तु. Church २ खाली, religious doctrine, atheist)

apologetics धर्मसिद्धांत-समर्थन

deist केवलेश्वरवादी

theist ईश्वरवादी

trinitarian पवित्रत्रियुतिवादी unitarian ईश्वरऐकवादी

to baptize (कर्ता : priest) स्नानसंस्कार देणे, बाप्तिस्मा देणे, धर्मदीक्षा देणे

baptism स्नानसंस्कार, बात्पिस्मा, धर्मदीक्षाविधी

to canonize (कर्ता : Church २) संतमहिमा स्वीकारणे

saint संत

to celebrate समारंभपूर्वक पार पाडणे, साजरा करणे

to confer grace on, to bless १ (कर्ता : God, priest) कृपाप्रसाद देणे, अनुग्रह करणे (तु. grace)

to confess १ (before God, before priest) पापकथन करणे, पापाची कबुली देणे.

२ (कर्ता : Priest) पापकथन स्वीकारणे, पापाची कबुली घेणे

to consecrate, to hallow, to sanctify, to bless २ (कर्ता priest) पुनीत करणे, प्राणप्रतिष्ठा करणे (तु. holy)

to create (कर्ता : God) निर्मिणे, सृष्टी करणे

creation निर्मिती, सृष्टि-उत्पत्ती

creator सृष्टिनिर्माता, स्रष्टा

creature निर्मित, सृष्ट

to glorify, to praise, to bless ३ (कर्म : God) स्तवन करणे. (तु. to pray, to worship)

hymn, psalm स्तवनगीत, स्तोत्र

psalm (in the biblical book) पवित्र स्तवनगीत, पवित्र स्तोत्र

to intercede (कर्ता : Mother १, saint) रदबदली करणे, परार्थप्रार्थना करणे.

to officiate (कर्ता : priest) धर्मविधी चालवणे, पौरोहित्य करणे, (तु. religious rite, church २ खाली liturgy, cleric)

to ordain (कर्ता, कर्म : cleric) धर्माधिकारदीक्षा देणे, सुदीक्षित करणे (तु. to baptize, cleric, vow ३)

ordination, taking holy orders सुदीक्षाविधी

to preach धर्मोपदेश करणे (तु. to proselytize, preacher)

sermon धर्मप्रवचन

to proselytize, to evangelize (कर्ता : proselytizer) धर्मप्रसार करणे (leg. religious conversion 1 & 2, to preach)

mission धर्मप्रसार-संघटना

poselytizer, evangelist, missionary धर्मप्रसारक, मिशनरी

to reveal (कर्ता : God) प्रकट करणे (तु. prophet)

revelation ईश्वरप्रणीत प्रकटीकरण

to seek grace from God, to pray to God for grace देवाची कृपायाचना करणे, देवाची प्रार्थना करणे (तु. to glorify, to worship)

prayer प्रार्थना

prayer song प्रार्थनागीत, भजन

to venerate, to revere पूज्य मानणे (तु. to consecrate, reverend, venerable)

to worship, to honour (कर्म : God) उपासना करणे (तु. to glorify, to seek grace from)

service, church worship धर्मपीठीय उपासना

hymn, psalm उपासनागीत, भजन (तु. to glorify, to seek grace from)

venerable (title for archdeacon) पूज्य (तु. to venerate, reverend)

vow १ शपथ २ नवस ३ संघदीक्षा (तु. religious order)

Word, Logos (योहानचे शुभवर्तमान, अध्याय १) शब्दतत्त्व

Works, meritorious acts (a person needs works, faith, God's grace towards his salvation) पुण्यसाधक कर्मे (तु. sin)

works of supererogation (beyond what duty requires) कर्तव्यातिरिक्त पुण्यकर्म

७, धनंजय, ७५९/८३, भांडारकर रस्ता गल्ली, पुणे४११ ००४.

***

# वक्ता दशसहस्रेषु

विजया देव

**परीक्षित ग्रंथ** : The Business Guide to Effective Speaking/Jacqueline Dunckell & Elizabeth Parnham/Kogan Page ltd. 1985)

'वक्ता दशसहस्रेषु' असं लिहून ठेवणाऱ्या सुभाषितकाराला वक्तृत्वकला किती कष्टसाध्य असते, याचं चांगलं भान असावं. प्रभावी वक्तृत्व ही सहज जमणारी, उत्स्फूर्त गोष्ट नव्हे. पण वक्तृत्व किंवा चारचौघांसमोर बोलणे हे सहज किंवा उत्स्फूर्त आहे, असे भासवायला तर लागते. म्हणूनच त्यामागे जाणीवपूर्वक प्रयत्न असावे लागतात.

वक्तृत्वाची ही बैठक कशी जमवावी, कोणती पूर्वतयारी करावी, याचे उत्तम मार्गदर्शन करणारे एक इंग्लिश पुस्तक वाचनात आले. जॅकलीन डंकेल आणि एलिझाबेथ पार्न्हॅम या लेखिकाद्वयाने लिहिलेल्या पुस्तकाचे नाव आहे : द बिझनेस गाइड टु इफेक्टिव स्पीकिंग.

कागदावर उत्तम ठरणारी भाषणं श्रोत्यांची मनं जिंकू शकतीलच, असं नाही. कारण बोलण्याच्या तयारीसाठी कागदच खूप खर्ची घातले जातात, बोलण्याच्या सरावाला मात्र वेळ दिला जात नाही; आणि बोलणं हे मूलतः ऐकण्यासाठी आहे, कोणाला दिसण्यासाठी नाही, हे सूत्र मध्यवर्ती ठेवून या मार्गदर्शिकेचा खटाटोप लेखिकांनी मांडला आहे.

जीवनव्यवहारातील सर्व गोष्टींत आपल्याला वाकबगार करून टाकायचा संकल्प सोडणारी मार्गदर्शक पुस्तकं अनेक असतात. प्रत्यक्षात चटपटीतपणापलीकडे फारसं काही अशा पुस्तकांमध्ये नसतं. प्रस्तुत पुस्तक मात्र त्याला अपवाद आहे.

वर्गातलं व्याख्यान, उद्योगक्षेत्रातील सभा, चर्चासत्र, रेडिओ, दूरचित्रवाणीवरचं बोलणं, मुलाखती अशा कोणत्याही प्रसंगी आपला विषय नेमकेपणानं मांडता येण्यावरच सर्व यश अवलंबून असतं. वक्तृत्वाचे जितके म्हणून प्रसंग आजच्या आधुनिक जीवनात, विविध क्षेत्रांत स्त्रीपुरुषांना येतात, त्या त्या सर्व प्रसंगांचा आणि त्यांना अनुलक्षून तंत्रांचा विचार या पुस्तकात केलेला आहे. उदाहरणार्थ, दृक्श्राव्य सामग्री हाताळणं, कॅमेऱ्याला सामोरं जाणं, सर्वसाधारण सभांची कार्यपद्धती माहीत असणं, सनसनाटी घटना घडल्यावर महत्त्वाच्या व्यक्तींशी संपर्क साधून दूरध्वनीवरून थेट मुलाखती प्रक्षेपित केल्या जाणं अशा वेळी विषयाच्या ज्ञानाखेरीज

एक वेगळा आत्मविश्वास लागतो. तो कसा संपादन करावा, याची माहिती हे पुस्तक देते.

एकशेवीस पानांच्या या छोटेखानी पुस्तकात सोळा प्रकरणांमध्ये वक्तृत्वाच्या विविध पैलूंचा विचार केलेला आहे. टिपणं काढणं, श्रोतृवर्गाचं भान ठेवणं, भाषणाची तयारी, आवाज-संगोपन, शरीरसंतुलन, प्रसारमाध्यमांना सामोरं जाणं, आयत्या वेळी बोलायची वेळ येणं, श्रोत्यांना खिळवून ठेवणं अशा विविध विषयांना ही प्रकरणं वाहिलेली आहेत.

यांतील प्रत्येक बाबीमध्ये लेखिका किती खोलात जाऊन विचार करतात, हे पाहण्यासाठी यातील दोन प्रकरणांची उदाहरणे घेऊ. 'सादरीकरणामागची तयारी' (Preparing your Presentation) हे प्रकरण बघा. स्वतःच्या आवाजाचा आधी स्वतःला सराव होणं इथून नियोजनाला सुरुवात होते. मग वक्तृत्वामागचा हेतू व श्रोतृवर्ग. हे ठरलं, की नियोजित विषयावर टिपणं काढायला सुरुवात. जे जे डोक्यात येईल, ते ते आधी कागदावर उतरवणं, क्रम वगैरे न ठरवता. याला लेखिका Scattergram म्हणतात. मग भाषणाचा गाभा ठरवणं. हा गाभा कोणताही असू शकेल. एखादा नवीन विचार, कल्पना श्रोत्यांच्या गळी उतरवणं, किंवा एखादं उत्पादन उत्कृष्ट कसं आहे, हे ठसवणं, वगैरे. मग मुख्य मुद्द्यांची मांडणी, त्यांची सुट्या कागदांवर नोंद, मुद्द्यांना पूरक आधार देणं आणि नंतर त्या सगळ्यांचा क्रम लावणं ही शिस्त पाळली, की भाषण तयार व्हायला लागतं. या नियोजनानंतर पारदर्शिका, नकाशे, इत्यादींची जुळणी. मग प्रास्ताविक आणि समारोप कसा करायचा, याचा विचार. याखेरीजही अनेक बारीकसारीक गोष्टींचा परामर्श लेखिका विस्तारानं घेतात.

व्याख्यानाचं तंत्र आता, 'गरज लागलीच, तर खडू-फळा तयार असणं' याच्या पुष्कळ पुढे गेलं आहे. मुद्द्यांच्या समर्थनासाठी, स्पष्टीकरणासाठी अनेक दृक्-श्राव्य-माध्यमांची मदत घेतली जाते. त्यांचा परिचय स्वतंत्र प्रकरणाद्वारे करून दिला आहे. ही माध्यमं पूरक म्हणूनच असतात, श्रोत्यांचा उत्साह ती वाढवतात, व्याख्यानाला त्यामुळं अधिक रेखीवपणा येतो, त्यांच्यामुळं व्याख्यानविषयामागचा हेतू साध्य व्हायला मदत होते, हे आधी लेखिकांनी स्पष्ट केलं आहे.

मग, ती केव्हा वापरावीत, त्यांचा सराव कसा करावा, स्लाइड्स मधील रंगसंगती, टाइपफेसचा वापर, इत्यादी मुद्दे येतात. तांत्रिक प्रगतीमुळं विविध दृक्-श्राव्य-माध्यमं आज उपलब्ध आहेत. उदाहरणार्थ, स्लाइड, ओव्हरहेड प्रोजेक्टर, ध्वनिफीत, चित्रफीत नकाशे, हस्तपुस्तिका, इत्यादी. पण लेखिकांचं वैशिष्ट्य हे, की त्यांनी साध्या खडू. फळ्यालाही यातून वगळलेलं नाही. तोही कसा वापरावा, याचं भान जागं केलं आहे. त्याबद्दल बारीकसारीक सोळा सूचना आहेत. उदाहरणार्थ, फळयावरचा अनावश्यक मजकूर पुसत राहणं, रंगीत खडूंचा वापर, रोमन लिपीतील 'प्रिंटिंग' आणि 'लाँगहँड'चा मुद्दे व विस्तारासाठी वापर,

कठीण आकृत्या आधी पुसट काढून ठेवून आयत्या वेळी ठळक करणं, इत्यादी.

हे सर्व विस्तारानं सांगण्याचं कारण असं, की लेखिकांनी या विषयाकडे किती गांभीर्यानं पाहिलं आहे, हे लक्षात यावं. श्रवण ही वक्तृत्वाची दुसरी बाजू आहे, हे त्या विसरलेल्या नाहीत. त्यामुळं चांगलं वक्तृत्व श्रोत्यांकडून चांगला प्रतिसाद मिळवतं, हे या पुस्तकाचं भरतवाक्य आहे.

प्रसारमाध्यमांची वाढ, तांत्रिक प्रगती, सर्व बाजूंनी होणारा माहितीचा भडिमार या सगळयांमुळं 'प्रभावी बोलणं' ही आपली गरज बनली आहे. या विषयाकडे लक्ष वेधून घेणारं, व सहज चाळलं, तरी नवं काही तरी देणारं म्हणून हे पुस्तक उल्लेखनीय आहे.

**सुप्रिया. ६१/१४, एरंडवन, पुणे ४११ ००४.**

***

## कानी पडलेला संवाद : असाही 'वृत्तिविकास'

एका घरातली तीन मुलं, अक्षय (वय १०), अमृता (७) आणि राधिका (४) खेळत आहेत.

'आपण बाबरीबाबरी खेळू या. अक्षय, तू कोण होणार ? हिदू, की मुसलमान ?'

'हिंदू.'

'मग तू मशीद तोडायची. राधिका पोलिस होणार, हवेत गोळीबार करणार. मी विद्यार्थी.'

एक स्टूल, त्यावर दोन उश्या, ही वादग्रस्त वास्तू. अक्षय काठी घेऊन उश्यांवर सपासप मारत राहतो.

'ठो ठो ठो...'

'मी चालले शाळेत.'

उश्या पडतात, खेळ संपतो.

**विजय नाईक, दिल्लीचे बातमीपत्र, सकाळ (पुणे) १९९३-०१-०५.**

***





अनुक्रमणिका

# १९९३ मधील भाषाविषयक लेखनाची सूची

-- /'अनुवादविषयक लेखनाची निवडक सूची' (वाङ्मयसूची)/भाषा आणि जीवन, पुणे /११.१-२ हिवाळा-उन्हाळा १९९३ पृ. ७९.

-- /मराठीतील अनुवादित कादंबऱ्या : चर्चासत्र (विशेषांक)/पंचधारा, हैदराबाद/वर्ष ३४ अंक ४, वर्ष ३५ अंक १-२, वर्ष ३५ अंक ३ आणि वर्ष ३५ अंक ४/अनुक्रमे जाफेमा १९९२, एप्रि.-सप्टेंबर १९९२, ऑडि १९९२, जाफेमा १९९३.

अडोणी दा.ल./ 'देखणी' शब्दाची अर्थपरिवर्तने'/ भाषा आणि जीवन/ ११: ४ दिवाळी १९९३.

आचार्य माधव ना. /'एक आयुष्यभराचा उद्योग' (पुस्तक परीक्षण)/परीक्षित पुस्तक : शुद्धलेखनविवेक ले. द. न. गोखले, सोऽहम् प्रकाशन, पुणे १९९३/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. ८६.

आवळीकर पंडित आणि तेलंग विजया, 'देशीकार लेणें' : काही अर्थ आणि उच्चार'/म. सा. पत्रिका, पुणे,/दिवाळी १९९३, अंक २६७ ऑडि १९९३/पृ. १३७

कविमंडन भा.ज./कविता : स्वरूप आणि रसास्वाद/मधुराज, पुणे/पृ. सं. १३२ किं ७० रु.

कविमंडन भा.ज./साहित्यकृती आणि रसिक/मधुराज, पुणे/पृ. सं. ११८ किं ६२ रु.

कविमंडन भा. ज./सौंदर्यविचार/मधुराज, पुणे/पृ. सं. १८०, किं ९० रु.

काकडे आसावरी/'कवितांचा अनुवाद : एक अनुभव'/भाषा आणि जीवन, पुणे/११.१-२, हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ४७

काळे कल्याण/'एक आगळावेगळा निर्णय' (संपादकीय)/भाषा आणि जीवन, पुणे/११:४, दिवाळी १९९३/पृ.१

काळे कल्याण/'डॉ. वऱ्हाडपांडे आणि नागपुरी बोली'/वसंत वैभव (डॉ. वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे स्मृति-ग्रंथ) संपा. डॉ. कुंदा वेळापुरे आणि डॉ. मदन कुलकर्णी/विदर्भ साहित्य संघ प्रकाशन, नागपूर, १९९३.

कुलकर्णी धनंजय/'शब्दांचे असेही बदलते रंग'/साप्ताहिक सकाळ, पुणे २३ ऑक्टोबर, १९९३/पृ. ५१.

कुलकर्णी व. दि./" 'शुद्धलेखनविवेक'च्या निमित्ताने'/म. सा. पत्रिका, पुणे/अंक २६६

जुलै-सप्टेंबर १९९३/पृ. ७८.

कुलकर्णी वंदना/'लहान मुलांसाठी हसत खेळत शिक्षण'/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. ६६

कुलकर्णी विरूपाक्ष/'अनुवाद आणि समीक्षा'/भाषा आणि जीवन, पुणे/११:१-२ हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ३१.

कुलकर्णी श्री. मा./'नागपुरी बोली : भाषाशास्त्रीय अभ्यास'/वसंतवैभव (कै. डॉ. वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे स्मृति-ग्रंथ)/संपा. डॉ. कुंदा केळापुरे, डॉ. मदन कुलकर्णी/विदर्भ साहित्य संघ प्रकाशन, नागपूर

केळकर अशोक रा./अनुवादविषयक काही पारिभाषिक संज्ञांची इंग्लिश-मराठी सूची (परिशिष्ट)/भाषा आणि जीवन, पुणे/११.१-२, हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. २७.

केळकर अशोक रा./अनुवाद : शास्त्र, की कला ?/भाषा आणि जीवन, पुणे/११.१-२, हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ५.

केळकर अशोक रा./'भाषा : शक्ती : सत्ता'/प्रतिष्ठान, औरंगाबाद/मे-जून १९९३/पृ. १२.

केळकर अशोक रा./'लोकशिक्षण आणि मराठी भाषा' (पुनर्भेट)/भाषा आणि जीवन, पुणे/११.१-३ पावसाळा १९९३/पृ. २४

केळकर अशोक रा./'लोकशिक्षणाची घराणी' (संपादकीय)/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. १.

क्षीरसागर शकुंतला/'भाषाशुद्धी : तीन दृष्टिकोन'/श्रीवाणी, धुळे/वर्ष १:अंक १ जून १९९३/पृ. ४३.

गर्दे पु. कृ./'ओके' (O.K.) ची कूळकथा' (शब्दकथा)/भाषा आणि जीवन/११:४ दिवाळी १९९३.

गुंडी नीलिमा/'आकड्यांची भाषा'(भाषानिरीक्षण)/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३/

गोखले करुणा/'स्त्री, पुरुष व त्यांची भाषा'/महाराष्ट्र टाइम्स, मुंबई/रविवार दि. १ ऑगस्ट, १९९३ (मैफल)/पृ. सात.

गोखले द.न./'लेखनचिन्हानुसारी वर्णक्रमी'/म.सा. पत्रिका, पुणे/एप्रिल-जून १९९३ अंक क्र. २६५/पृ. २२.

गोखले द.न./शुद्धलेखनविवेक/सोऽहं प्रकाशन, पुणे/पृ. १६८.

गोखले द.न./'शुद्धलेखनातील ऱ्हस्व-दीर्घ'/म.सा. पत्रिका, पुणे/अंक क्र. २६४, जाने-मार्च १९९३/पृ. ३७.

ग्लुश्कोव्हा इरिना/'लेख लिहिण्याचं हळवं निमित्त'/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३.

चुनेकर सु.रा./'शुद्धलेखन-विवेक' (ले.द.न. गोखले) या पुस्तकाचं परीक्षण/नवभारत/वर्ष ४६ अंक ४,५,६/जाने-मार्च १९९३/पृ. १६३.

जतकर अरुण/'मुळाक्षरांची महासभा'/म.सा.पत्रिका, पुणे/अंक क्र. १६५ एप्रिल-जून १९९३/पृ. ६७.

जोगळेकर गं.ना./'मराठी भाषेच्या अभ्यासातील एक महत्त्वपूर्ण टप्पा' (कृ. श्री. अर्जुनवाडकरांच्या 'मराठी व्याकरणाचा इतिहास' या ग्रंथाचे परीक्षण)/महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे/अंक १६६, जुलै-सप्टेंबर १९९३/पृ. ६३.

जोशी श्रीपाद/'ग्राम्यतेतील सामर्थ्य'/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. ७१.

टाकसाळे संध्या/" 'गप्पाटप्पा' (मराठी भाषेचा विकास व्हावा, म्हणून) डॉ. सरोजिनी वैद्य यांची मुलाखत'/साप्ताहिक सकाळ, पुणे/१२ जून, १९९३/पृ. III

डोंगरे सुधा/'अनुवाद आणि निर्मितिक्षमता' (टिपण)/युगवाणी वर्ष ४९: अंक ३-४ मार्च-एप्रिल १९९३/पृ. २०

तर्खडकर दादोबा पांडुरंग/रावसाहेब दादोबा पांडुरंग आत्मचरित्र/अनुभव प्रकाशन, (प्रतिभा प्रतिष्ठानसाठी)/पृष्टसंख्या २३१/किं ६५ रु.

देव विजया/'भाषिक खोड्या'/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३

देव विजया (परीक्षण लेखक)/'मराठीतील पहिला अवतरण कोश' (पुस्तक परीक्षण) भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३.

देव विजया/'सभास्थानीचे संकेत (ज्याची त्याची प्रचीती)/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा ११: ३/पृ. ८१.

देवधर य. चिं./'मौखिक अनुवाद : एक व्यवसाय व व्यवहार'/भाषा आणि जीवन, पुणे/११:१-२ हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ६१.

देशपांडे गौरी/'अभाषांतरीय ? आणि यासाठी ?' (साद आणि प्रतिसाद)/भाषा आणि जीवन, पुणे/११:१-२, हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ९३.

देशपांडे गौरी/'भाषांतरातील सममूल्यता आणि जाईची नवलकहाणी'/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३.

देशपांडे स. ह./'एक वैय्याकरण, त्याचे ग्रंथ व त्याची खंत'/प्रतिष्ठान, औरंगाबाद, नोव्हेंबर-डिसेंबर १९९३/वर्ष ४०, अंक ८/पृ. ५५.

धोंडगे दिलीप/"अरुण कोलटकर यांची काव्यशैली आणि श्री ज्ञानेश्वर समाधिवर्णन" ह्या कवितेचे शैलीशास्त्रीय विश्लेषण/प्रतिष्ठान, औरंगाबाद/जाने-फेब्रु. १९९३/पृ. ३१.

नेऊरगावकर वि. गं./'अनुवाद : एक व्यवसाय'/भाषा आणि जीवन, पुणे/११:१-२, हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ५७.

पाटील गंगाधर/'देरिदा आणि वि-रचनावाद'(लेखांक - तिसरा) (रेखेची वाहाणी)/अनुष्टुभ-लासलगाव/जाने. फेब्रु. १९९३/पृ. ३२.

पाटील गंगाधर/'देरिदा आणि वि-रचनावाद' (लेखांक चवथा) (रेखेची वाहाणी)/अनुष्टुभ लासलगाव/जुलै-ऑगस्ट १९९३/पृ. ५.

पाठक यशवंत/'कीर्तन आणि लोकशिक्षण'/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. ४८.

पुंडे दत्तात्रय/'भाषांतरातील सर्जकता'/भाषा आणि जीवन, पुणे/११:१-२, हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. ४०.

बडवे नीती/'म्हणजे शब्द आपणहून येतील'/भाषा आणि जीवन, पुणे/११:४, दिवाळी १९९३

बनहट्टी वसुंधरा/ज्ञानदेवांच्या अभंगातील शब्दकळा/सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे/जाने १९९३, पृ. १४ + २१२/कि ७५ रु.

बापट द.श्री./'सर विल्यम जोन्स : एक सच्चा ज्ञानोपासक'/महाराष्ट्र साहित्य पत्रिका क्र. २६६/जुलै-ऑगस्ट १९९३

मालशे मिलिंद स. (अनुवादक)/'नियम आणि प्रतिरूपे' ( संरचना, सामर्थ्ये व संकेत) ले. नोम चॉम्स्की/नवभारत, वाई/वर्ष ४५, अंक ९ जून १९९२ (प्रसिद्धी १९९३)/पृ. ३३

मुंडले आशा/लोकशिक्षणाचे राजमार्ग, आडमार्ग आणि वाममार्ग/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. २०.

मोडक गो. कृ/मराठी व्युत्पत्तिकोश/आ. ३/शुभदा-सारस्वत, पुणे/१९९३.

राईलकर मनोहर/'सल'/भाषा आणि जीवन, पुणे/११:४, दिवाळी १९९३.

रायकर सीताराम/'अनुवादातील क्रमपरिवर्तनामुळे अर्थहानी' (साद आणि प्रतिसाद)/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३.

वैद्य सरोजिनी/'हिंदू पंच' द्वारा लोकांचे शिक्षण/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. ६३.

शहा मृणालिनी/'वादे वादे जायते तत्त्वबोधः'/भाषा आणि जीवन, पुणे/११:३ पावसाळा १९९३/पृ. ४.

शेणई सुजाता/' 'लोकशिक्षण' मासिके :एक नोंद'/भाषा आणि जीवन, पुणे/११:३/पावसाळा १९९३/पृ. ५९.

श्याम विमल/'अस्मितेचा स्रोत' (कविता)/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३.

संगोराम मुकुंद/'वृत्तपत्रातील मराठी : एक अजब अनुवाद-प्रक्रिया'/भाषा आणि जीवन/११:१-२ हिवाळा-उन्हाळा १९९३.

संत दु. का./'एका शब्दाचा मृत्युलेख'/भाषा आणि जीवन, पुणे/११:४ दिवाळी १९९३

सामंत सत्त्वशीला/'मराठी परिभाषा: काल, आज आणि उद्या'/श्रीवाणी, धुळे/वर्ष १:अंक १ जून १९९३/पृ. २४.

सोमण अंजली/'अनुवाद आणि भाषेचे पोषण (संपादकीय)/भाषा आणि जीवन, पुणे/११:१-२ हिवाळा-उन्हाळा १९९३/पृ. १

सोहोनी गो. श्री./'मराठीवरून अनुवादित कन्नड साहित्य'/अनुबंध, गुलबर्गा/वर्ष १७:२-३, ६६-६७ जुऑस, ऑनोडि १९९३/पृ.२८.

***

सूचना फलक

# पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधी (वृत्तपत्रे आणि पुस्तके नोंदणी अधिनियम, कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली, १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते, ते निवेदन).

| | |
|---|---|
| १. प्रकाशन स्थळ | पुणे, महाराष्ट्र. |
| २. प्रकाशनाची कालनियतता | त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये. |
| ३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता | मृणालिनी शहा, भारतीय, १, शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. |
| ४. मुद्रणस्थळ | |
| ५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता | मृणालिनी शहा, भारतीय, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे. |
| ६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता | कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७. |

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते :

मराठी अभ्यास परिषद, द्वारा. अशोक रा. केळकर, ७, धनंजय सोसायटी, ७५९/८३, शिवाजीनगर, पुणे ४११ ००४.

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते, की वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**मृणालिनी शहा**
**प्रकाशक**
**पुणे, २६ एप्रिल, १९९४**

### पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनी ऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठविणाराचे नाव, पत्ता रक्कम आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रक्कमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

#### पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद-वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षांपैकी असो) १५ रु.

परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर

परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर

सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

#### परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रुपये भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर) हितचिंतकांसाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रय दात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसांठी ५०० डॉलर) किंवा जास्त (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

#### जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु. आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठी असल्यास उत्तम.

***

नोंदणी क्रमांक ०४००४८/८३

■ **आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार ?**

* सभासद नसलात तर प्रथम स्वतः सभासद व्हा.
* सभासद असलात तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.
* परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल, तर चिटणिसांशी संपर्क साधा.
* परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.
* परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.
* परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

■ **आपण पत्रिकेसाठी काय करू शकता ?**

* लेखन पाठवा.
* परभाषांतून अनुवाद करा.
* ग्रंथ परीक्षणे लिहा.
* 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.
* भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.
* पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते ?
* जाहिराती मिळवून द्या.
* संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.


-- *संपर्क* --

*मराठी अभ्यास परिषद*

*१, शीतल अपार्टमेंट*

*४६/४ एरंडवन, पुणे ४११ ००४*

***(दूरध्वनी : ३३३८६९)***